# गुजगोष्टी

लेखक

प्रो. ना. सी. फडके, एम्. ए.



प्रकाशक

दि इंटरनॅशनल बुक सर्व्हिस, पुणें ४

१९३३

या पुस्तकाच्या मलपृष्ठावरील मोहक चित्र काढून
दिल्याबद्दल श्री. **बाबूराव पेंटर** यांचा
प्रकाशक अत्यंत आभारी आहे.



ज्याच्या गुजगोष्टींनीं जिवाला दिलेला आनंद
अविनाशी आहे, पण ज्याच्या किती
तरी गुजगोष्टी ऐकायच्या तशाच
राहिल्या त्या माझ्या लाडक्या

# प्रस्तावना

या संग्रहांतील अखेरच्या दोन गुजगोष्टी संग्रहासाठीं मुद्दाम नव्या लिहिल्या आहेत. बाकीच्या पूर्वीं वेळोवेळीं रत्नाकर मासिकांत प्रसिद्ध झालेल्या आहेत.

गुजगोष्टी लिहिण्याच्या तंत्राविषयीं मीं विस्तृत खुलासा करावा अशी पुष्कळ जिज्ञासू वाचकांनीं व लेखकांनीं मला अनेक वेळां विनंति केली. माझ्या **प्रतिभासाधन** ग्रंथांत या लेखनप्रकाराची चर्चा हवी होती असाही पुष्कळांनीं अभिप्राय दिला. या कारणानें पुस्तकास प्रस्तावना लिहिण्याचा माझा विशेष रिवाज नसतांही गुजगोष्टी लिहिण्यांत मी स्वतः कोणतीं तत्वें डोळ्यांपुढें ठेवतों तें येथें थोडक्यांत सांगणें अवश्य झालें आहे.

गुजगोष्ट म्हणजे निबंधाचाच एक प्रकार खरा. परंतु निबंधाहून तिचें स्वरूप फार वेगळें करून मीं ती प्रचारांत आणली आहे. मला नुसते लहान निबंध लिहावयाचे असते तर लघुनिबंध अशी संज्ञा मीं त्यांस दिली असती. ‘ गुजगोष्ट ’ हें नांवच मीं अशा हेतूनें योजिलें, कीं या लेखनप्रकाराचें स्वरूप, निबंधापेक्षां निकटवर्ती मित्राशीं केलेल्या गुजगोष्टीसारखें अधिक असावें हें दर्शवावें. या लेखनप्रकारांत मार्मिक विचारांस अवकाश असतो, पण एखाद्या विषयाचा सांगोपांग विचार करण्याची खटपट केली तर ती सौंदर्य-विघातक ठरते. तसेंच या लेखनप्रकाराची खरी शोभा उपमालंकारां-वांचून प्रगट होत नाहीं; पण काव्याचा अतिरेक त्यास यत्किंचितही

खपत नाहीं. सारांश, मार्मिक आणि नवे विचार, आणि ते पुढें मांडण्याचें लालित्य ही गुजगोष्टी लिहिण्याची मुख्य सामग्री होय.

अर्थात् गुजगोष्टीस विषय निवडावयाचा तो या धोरणानें निवडावा लागतो. जी वस्तू लोकांच्या सामान्य दृष्टीला क्षुद्र अगर उपेक्षणीय वाटत असेल तिच्या विषयींच बोलायला लागून तींत सौंदर्य असल्याचें पटवून द्यायचें असें तारतम्य ठेवलें म्हणजे विषय निवडण्याचें काम सोपें होईल. "पाऊस", "जुनीं पुस्तकें", या माझ्या गुजगोष्टींचे विषय अशा तारतम्यानेंच निवडलेले आहेत. याचा अर्थ असा कीं, चमत्कृति हा गुजगोष्टीचा आत्मा होय. ही चमत्कृति विषयाच्या निवडींत असावी, किंवा त्यांत नसेल तर गोष्टीच्या ओघांत आणावी. म्हणजे असें, कीं अगदीं साध्यासुध्या गोष्टीविषयीं बोलतां बोलतां त्यांत अचानक एखाद्या मोठ्या तत्त्वावर प्रकाश पाडल्यासारखें करावें. या संग्रहांतील शेवटच्या "सहल" या गुजगोष्टीची अखेरी मीं याच धोरणानें केली आहे.

पण गुजगोष्टींतील या चमत्कृतीपेक्षांही अधिक महत्त्वाचें तंत्र म्हणजे तिच्यांत प्रगट होणारी वृत्ति आणि तिची भाषा. गुजगोष्ट लिहिणारानें अशा वृत्तीनें लिहिलें पाहिजे, कीं जणुं आपण व वाचक यांमध्यें कांहीं परकेपणा नाहीं. आपल्या अनुभवाच्या बऱ्या वाईट गोष्टी, आपण केलेलीं सत्कृत्यें व आपल्या हातून घडलेल्या चुका, आपल्या आवडीनिवडी, खोडी, लहरी—सारें कांहीं निवेदनाच्या ओघांत येईल तसें येऊं द्यायचें अशी वृत्ति लेखकानें ठेविली पाहिजे. लेखक व वाचक यांजमधील अंतर जितकें नाहींसें झाल्यासारखें गुजगोष्टींत वाटेल तितकी ती सरस वठेल. वाचक म्हणजे आपल्या अंतरंगांतले मित्र अशा बुद्धीनें गुजगोष्ट लिहिली गेली पाहिजे.

अर्थात् या वृत्तीला साजेशीच भाषा गुजगोष्टीच्या लेखकानें योजिली पाहिजे. काव्याचे अलंकार न टाकतां भाषा जितकी **सुबोध, हलकी, मनमोकळी, गंमतीनें बोलल्यासारखी** ठेवतां येईल तितकी गुजगोष्ट अधिक रंगेल. गुजगोष्टीसाठीं कोणत्या प्रकारची भाषा कमावण्याचा मीं स्वतः प्रयत्न केला तें वाचकांस पाहतां यावें या हेतूनें ज्या क्रमानें माझ्या हातून गुजगोष्टी लिहून झाल्या तोच क्रम मीं या संग्रहांत मुद्दाम कायम ठेवला आहे. या संग्रहांतील प्रारंभीच्या गुजगोष्टींची भाषाशैली कशी आहे, व ती पुढें पुढें कोणत्या वळणानें बदलत गेली आहे तें नीट पाहिल्यास कुशाग्र बुद्धीच्या अभ्यासकांस अवश्य ती दिशा सहज दिसेल.

मला वाटतें येवढी चर्चा पुरे झाली. ज्यांस ती पुरी वाटली नसेल त्या वाचकांस येवढेंच सांगतों कीं, कलावस्तूचें तंत्र खरें पाहतां तिच्या अंगाखांद्यांवरच असतें. तिच्याकडे नीट न्याहाळून पुनः पुन्हा पहावें म्हणजे तें कोणीं न सांगतां आपल्याला दिसूं लागतें. गोष्टी लिहिण्याच्या तंत्रावरचें एखादें पुस्तक सांगा असें मला कोणीं विचारलें, कीं मी कित्येकदां सांगतों, गोष्टींच्या तंत्रावरील सर्वोत्कृष्ट पुस्तक म्हणजे त्या गोष्टीच. त्या डोळसपणें वारंवार वाचाव्या म्हणजे त्या लिहिण्याचें शास्त्र आपोआप समजतें. तोच न्याय गुजगोष्टींसही लागू; नाहीं कां?

कोल्हापूर
१० एप्रिल, १९३३

**ना. सी. फडके**

# अनुक्रमणिका

# सुहास्य

स्त्रीचें काव्यमय वर्णन करावयाचें झालें कीं, तिला सुहासिनी हें विशेषण देण्याचा प्रचार आहे. सरल नासिका, लांब सडक काळे केस, प्रफुल्ल नेत्र, याप्रमाणेंच सुहास्यामुळेंही स्त्रीच्या सौंदर्याला शोभा येते हें सर्वमान्य आहे. पण याचा अर्थ असा नव्हे, कीं सुहास्य हें स्त्रीच्या बाबतींत तेवढें आल्हादकारक आहे, आणि पुरुषाच्या बाबतींत नाहीं. खरें पाहतां हंसतमुख हें उमलल्या कळीप्रमाणें किंवा चतुर्थीच्या चंद्रकलेप्रमाणें आहे. तें कोठेंही दिसलें तरी पाहणाराची वृत्ति प्रसन्न झालीच पाहिजे. तरुणीच्या सुहास्यांत कधीं कामुकता, कधीं साधी प्रसन्नता, तर कधीं नुसता विनय, असे निरनिराळे विकार प्रगट होतील, पण हास्याची उत्पत्ति कोणत्याही मनोवृत्तींतून झाली तरी त्याची आकर्षकता सदा सारखीच असते; आणि कामिनीच्या तोंडावर विलास करणाऱ्या भावपूर्ण हास्याप्रमाणेंच लहान अर्भकाच्या तोंडावरचें भावशून्य साधेंसुधें हास्यही मनोरम वाटतें.

इतकेंच काय, ज्याच्या तारुण्याची सारी सौंदर्यसंपत्ति नाहींशी झाली आहे अशा म्हाताऱ्याच्या, किंवा ब्रह्मदेवानें ज्याच्या हातीं सौंदर्यसंपत्तीची एक पैही लागूं दिली नाहीं अशा एखाद्या कुरूप पुरुषाच्या तोंडावर चमकणारें हास्यही, तें अंतःकरणापासूनचें असेल तर, आनंददायक वाटल्यावांचून रहात नाहीं. कुरूप स्त्रीनें किंवा पुरुषानें भूषणांचा किंवा वस्त्रालंकारांचा सोस केला कीं, तें दृश्य रमणीय वाटण्याऐवजीं उपहासास्पदच वाटतें. नकट्या नाकावरची मोरणी, हाडकुळ्या उंच मानेंतल्या पोतपेट्या, काटकुळ्या दंडावरच्या वांकी आणि काळ्या कभिन्न देहावरचें कोईमतुरी गुलाबी पातळ, हीं सर्व आल्हादापेक्षां विनोदाचींच उत्पत्तिस्थानें ठरतील; आणि त्याचप्रमाणें कोळशाचा रंग आणि उंसाच्या चिपाडाचें सौष्ठव अंगीं असणाऱ्या एखाद्या तिरळ्या माणसानें भिकबाळी-सलकड्यांचा थाट केला आणि रेशीमकांठी धोतर-उपरण्यांचे सोंगे सोडले तर ते पाहून पाहणाऱ्या डोळ्यांना समाधान वाटण्याऐवजीं वीटच येईल. परंतु सुहास्याची गोष्ट मात्र अशी नाहीं. हंसणारी व्यक्ति कशीही असली तरी तिचें सुहास्य पाहणाराच्या मनाला प्रसन्न करील. शेवाळाच्या अलं-कारानेंही कमळ सुंदरच दिसतें, या कालिदासाच्या उक्तींत जरा पालट करून असें म्हणतां येईल, कीं सुहास्य हा अलंकार असा आहे कीं, तो कोणत्याही मुखकमलावर मनोहरच वाटतो.

आणि याचें कारण हें कीं, हा अलंकार कृत्रिम नसून नैसर्गिक आहे. सुहास्य हें एका अंतःप्रवृत्तीचें चिन्ह आहे, व ती अंतः-

प्रवृत्ति अत्यंत रमणीय अशी आहे. या अंतःप्रवृत्तीला तुम्ही कोणतेंही नांव द्या; किंवा तिला कोणतेंही नांव दिलें तरी तिचा बोध नीटसा होणार नाहीं अशी ती गूढ आहे असें वाटल्यास म्हणा. पण येवढें खास कीं ती आकर्षक आहे. जगाच्या व्यवहारांत हरघडी कांहीं अंतःकरणें एकमेकांकडे आकर्षित केलीं जात असतात, आणि कांहीं परस्परांपासून अलग होत असतात. यांपैकीं दोन अंतःकरणांचें आकर्षण ज्या ज्या वेळीं होतें त्या त्या वेळीं तेथें वर सांगितली ती अंतःप्रवृत्ति उत्पन्न झालेली असते. ही अंतःप्रवृत्तीच सुहास्यरूपानें प्रगट होते; आणि म्हणूनच सुहास्याचा अलंकार नैसर्गिक असून त्याची शोभा कांहीं वेगळीच असते असें म्हटलें पाहिजे. सौंदर्य हें बाह्यांगामध्यें किंवा वस्त्रालंकारांमध्यें नसून अंतःकरणाचें जें सौंदर्य तेंच खरें सौंदर्य असें सर्व कवि व तत्ववेत्ते सांगतात; आणि हें जर खरें तर सुहास्याचें सौंदर्य सर्वांत उच्च दर्जाचें होय यांत शंका नाहीं.

शिवाय असें कीं, सुहास्याचा हा अलंकार निसर्गनिर्मित असूनही त्याची इच्छा करतांच तो मनुष्याला प्राप्त होतो. शरीरसौंदर्याची आणि वस्त्रालंकारांची गोष्ट अशी नाहीं. गरीब कारकुनाच्या पत्नीनें मोत्याच्या कंकणांची कितीही वांच्छा केली तरी ती " उत्पद्यन्ते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः " या सदरांतच जाणार ! वाढप्याच्या बायकोला बुट्याच्या काळ्या शालूची केवढीही हौस वाटली तरी ती हौस तिच्या नेसत्या जुनेराइतकीच अपुरी राहणार ! आणि बागेंतल्या वाटा

झाडणाऱ्या माळ्याच्या मुलाला राजासारखे विविध रंगांचे साफे बांधावेसे वाटले तरी त्याच्या डोक्यावर जन्मभर मळकट मुंडासेंच राहणार! शरीरसौंदर्याची प्राप्ति तर सर्वस्वीं मनुष्याच्या सत्ते-बाहेरची असते. वस्त्रालंकार मिळवितां आले नाहींत तर निदान उसने मागून आणतां येतील, किंवा तितका अट्टहास करावयाचाच झाला तर चोरून आणतां येतील! पण शरीरसौंदर्य म्हणजे विधीनें कायमची ओढलेली काळ्या दगडावरची रेषा! नकट्या नाकाच्या स्त्रीला चांफेकळीसारखें नाक नकोसें कां असतें? अरुंद कपाळाच्या आणि रुंद जिव्हणीच्या बाईला आपल्या अवयवांच्या मापांत अदलाबदल झाली असती तर बरें झालें असतें असें वाटत कां नाहीं? रंभेच्या रूपाचा अलौकिकपणा कुब्जेलासुद्धां कळत कां नसतो? पण तो सर्वस्वीं पराधीन आहे याचीही जाणीव तिला असते. सारांश, शरीरसौंदर्याचा अलंकार निसर्ग-निर्मित असला तरी तो सर्वांना सारखा वापरतां येण्यासारखा नाहीं. उलट सुहास्याचा अलंकार मात्र असा आहे, कीं तो जितका अकृत्रिम आणि नैसर्गिक तितकाच सर्वांच्या आटोक्यां-तील आहे. रानावनांत झुळझुळ वाहणाऱ्या ओढ्याच्या कांठीं फुललेल्या वेलींवरील फुलाप्रमाणें सुहास्याचें भूषण कोणीहि ल्यावें, आणि तें धारण करून स्वतःची प्रसन्नता इतरांच्या ठिकाणीं उत्पन्न करावी.

होय! इतरांच्या ठिकाणीं उत्पन्न करावी! कारण, सुहास्य हें ज्या भावनेचें चिन्ह आहे ती इतर भावनांप्रमाणेंच संसर्गजन्य

आहे. एकाचें अंतःकरण शोकविव्हल होऊन त्यानें हुंदका दिला कीं दुसऱ्यालाही न कळत हुंदका येतो; आणि अंतःकरणाच्या पूर्ण प्रसन्नतेनें एकजण हंसला कीं, दुसऱ्याचेही ओंठ हळूच हालल्याखेरीज रहात नाहींत. किंबहुना असें ह्मणतां येईल कीं, सर्व मानवी अंतःकरणाचा समुच्चय हा एखाद्या जलाशया-सारखा आहे. त्याच्या एका भागांत जे तरंग उठतील त्यांची प्रतिक्रिया घडून इतर भागांतही ते उठलेच पाहिजेत. हंसण्याच्या ऐेन भरांत आलेल्या मनुष्याला रडण्याचा आक्रोश ऐकूं आला तर त्याचा आनंद क्षणमात्र विरघळल्यावांचून राहणार नाहीं. उलट, भोंवतालचीं सारीं माणसें आनंदानें हंसत खिदळत अस-तांना आपलें दुःख न विसरणारा, आणि चेहऱ्यावरची विषण्णतेची छाया कायम राहूं देणारा मनुष्य क्वचितच आढळेल.

भावनांचा संसर्ग फार विलक्षण असतो. एकाचे विचार दुसऱ्या माणसाला पटावयास फार अवधि लागतो; पण भावनांचा संचार अतिशय शीघ्र वेगानें होत असतो. महंमदाच्या धर्मतत्त्वांची उच्चता त्याच्या समकालीनांना कळेना; आणि ह्मणूनच आपल्या पत्नीला ती पटली हें पाहतांच त्याला अमर्याद आनंद झाला. पण ज्या लोकांना महंमदाच्या मतांची थोरवी कळणें कठीण होतें याच लोकांवर, इतर धर्मपंथांचा उच्छेद करण्यास्तव उच्चारलेल्या "अल्ला हो अकबर" या गर्जनेतील भावनेचा पगडा सहज बसला. विचार किंवा मतें हीं मधाप्रमाणें होत. एका अंतःकरणां-तून दुसऱ्या अंतःकरणांत त्यांचें प्रसरण व्हावयास उशीर लागतो.

भावना किंवा विकार मात्र तैलबिंदूप्रमाणें शीघ्रगामी असतात. रागद्वेषादि भावना आगीच्या डोंबासारख्या अल्प काळांत सर्व देशभर पसरतात हें इतिहासावरून सहज समजण्यासारखें आहे; आणि आनंद किंवा हर्षदेखील सुखस्पर्शी वायुलहरीप्रमाणें झट्कन पसरतो याचा अनुभव रोजच्या व्यवहारांतसुद्धां हरघडीं मिळेल. ह्मणूनच मीं ह्मटलें कीं, जो अंतःकरणाची प्रसन्न वृत्ति ठेवून सुहास्य धारण करील तो इतरांच्या ठिकाणींही प्रसन्नता उत्पन्न केल्यावांचून राहणार नाहीं.

यासाठींच सदा हंसतमुख असणाऱ्या माणसाचें महत्त्व मला फार वाटतें. सदा हंसतमुख असणारा मनुष्य सूर्यप्रकाशा-इतकेंच लोकांचें हित करतो. मानवी शरीरांतील रोग वालवि-ण्याचें सामर्थ्य सूर्यप्रकाशांत आहे, त्याप्रमाणेंच लोकांचीं कुढणारीं मनें प्रफुल्लित करण्याची शक्ति सुहास्यमुखी मनुष्यांत आहे. असा मनुष्य जेथें जेथें जाईल त्या त्या ठिकाणीं प्रसन्नतेचें वाता-वरण निर्माण करील यांत संशय नाहीं. एखाद्या सभेंत आधींच भरपूर रोषनाई असली तरी सुहास्यवदन अशी एखादी व्यक्ति तेथें आली कीं आणखी पांच पंचवीस दिवे एकदम प्रज्वलित झाल्यासारखें वाटतें. प्रत्यक्ष परमेश्वर आनंदमय आहे हें जर खरें, तर या कष्टमय अवनीतलावर हंसतमुखानें वावरणारा मनुष्य एक प्रकारें परमेश्वराचेंच स्वरूप उघड करीत असतो असें मला वाटतें. विश्वकर्त्या प्रभूचें मानवी जीवांना पुनःपुन्हा स्मरण करून देणें हेंच ज्यांचें जीवितकार्य होतें ते नारदमुनि

विनोदप्रिय आणि सदा सुहास्यवदन होते यांतील मर्महि हेंच होय.

पण हास्यवदनाची ही थोरवी फारच थोड्या लोकांना कळते. नीतिमान असावें, धर्मशील असावें, अशा उपदेशाचा कंठरव आपल्या कानीं कपाळीं नित्य होत असतो. परंतु माणसानें सदा सर्वदा सुहास्यवदन असावें असें कोणी कोणाला सांगतांना ऐकूं येत नाहीं. तसेंच म्हटलें तर कट्टया कर्मठ माणसापेक्षां नेहमीं हंसतमुख असणारा मनुष्य अधिक योग्यतेचा समजला पाहिजे. सकाळ संध्याकाळ चार चार घटका जपजाप्य करणारा, भोजनापूर्वीं देवदर्शन करण्याविषयीं दक्षता ठेवणारा, आणि शास्त्रविहित व्रतवैकल्यें कडकडीतपण करणारा माणूस सदा आंबट चेहरा करून रहात असेल, आजूबाजूच्या माणसांवर हरवडी खेंकसत असेल, आणि प्रत्येक कामांत चिरचिर करीत असेल तर त्याच्या धर्ममार्तंडत्वामुळें समाजाचें—आणि खरें म्हटलें तर त्याचें तरी कोणतें कल्याण होईल ? उलट, एखादा मनुष्य सदा हंसतमुख असेल तर त्याच्या धर्माभिमानाची ज्वाला विशेष प्रखर नसली तरी, केवळ आपल्या सान्निध्यानें देखील लोकांच्या दुःखानें गारठलेल्या अंतःकरणांत तो आशेची ऊब उत्पन्न करील. आधींच जग कटू गोष्टींनीं व कटू अनुभवांनीं भरपूर भरलेलें आहे. कटू दृश्य पहावयाचें झालें तर माणसानें आपली नजर कोणीकडेही फिरविली तरी तें त्याच्या दृष्टीस पडेल. अनंत संकटांनीं, व्याधींनीं आणि यातनांनीं गांजलेल्या या जगांत दुःखी

कष्टी चेहऱ्याचा अंधकार सगळीकडे साहजिकपणेंच भरलेला आहे. हास्याचे सूर्यकिरणच या संसारांत दुर्मिळ आहेत, आणि ते किरण जेथून प्रसृत होत असतील त्या चेहऱ्याचें पावित्र्य शेंकडों धर्मक्षेत्रांहून अधिक समजलें पाहिजे. "देव तेथेंचि जाणावा" असेंच कवि त्याविषयीं ह्मणतील! "हाचि हाचि खरा धर्म" असेच उद्गार कोणीही साधुसंत त्याविषयीं काढतील. कारण संसारांतील दुःखांचा विसर ज्या योगानें पडतो आणि जीवांच्या ठिकाणीं प्रसन्नवृत्तीचा परिपोष ज्या योगानें होतो तोच खरा धर्म होय. सुहास्य केवळ काव्यविषय नसून उच्च धर्मतत्त्व आहे. त्याचें आचरण प्रत्येकानें करावें. सर्व स्त्रीपुरुष सुहास्यवदन झाले तर सृष्टीची नुसती शोभाच वाढणार नाहीं, तर संसार अधिक धर्ममय होईल. खरें सौंदर्य आणि खरा धर्म हीं परस्परविरोधी नसतात ही गोष्ट सिद्ध करण्याचें सामर्थ्य सहस्र प्रवचनांत नसेल; पण सुहास्यवदनांत खचित आहे!

—जानुआरी, १९२६

२

# बालवृत्ति

चार रंगीबेरंगी वेडीं वांकडीं खेळणीं घेऊन खेळणाऱ्या मुलांना त्या खेळण्यांपासून जितका आनंद होतो तितकाच आनंद— किंबहुना त्याहून अधिक—त्या मुलांना पाहिल्यानें मोठ्या माणसांना होत असतो. खेळांतील भावलाभावलींवर नानाप्रकारच्या भावनांचा, आवडीनिवडींचा आणि रागलोभादि विकारांचा आरोप करून त्यांचें कोडकौतुक पुरवितांना चिमुकलीं मुलें आपलीं चिमकुलीं सुखदुःखें विसरतात; आणि त्या मुलांच्या अंतःकरणाचा तो सरळपणा व साधेपणा पाहून मोठ्या माणसांना आपल्या मोठ्या दुःखांचा विसर पडतो. वास्तविक, ज्यामुळें माणसाचें देहभान हरपावें असें खेळांतल्या भावलाभावलींत, हत्तीघोड्यांत किंवा चूलबोळक्यांत कांहींच नसतें. पण मुलांना त्यांच्यापुढें तहानभूक सुचत नाहीं. तीं त्यांत तन्मय होऊन जातात. आणि त्यांच्या निर्व्याज वृत्तीचें कौतुक करण्यासाठीं आपण म्हणतों, "रम्य तें बालपण देईं, देवा, फिरुनि."

प्रौढ माणसांनीं केलेलं लहान मुलांच्या साध्या, भाबड्या वृत्तीचें हें कौतुक कधीं कधीं शुद्ध असतें, तर कधीं कधीं त्यांत एक हिणकस भावना मिश्रित झालेली असते. लहान मुलांच्या ठायीं विचारशक्ति कमी असल्यामुळें अर्थशून्य खेळण्यांतही त्यांचें मन रमूं शकतें, अशा तुच्छतेच्या आविर्भावानें कित्येक वेळां मोठीं माणसें त्यांच्या खेळाचें कौतुक करतात. मोडक्यातोडक्या बाहुलीला काल्पनिक अंगडेंटोपडें घालण्यांत आणि काल्पनिक पक्वान्नें भरविण्यांत स्वतःचें जेवण विसरणाऱ्या मुलीचें, आणि दाराच्या उंबरठ्याची गाडी कल्पून, त्यावर बसून, तिचे काल्पनिक घोडे भरधांव सोडून "बाजू!" म्हणून ऐटीनें ओरडणाऱ्या मुलाचें कौतुक करतांना पुष्कळदां त्यांच्या भाबडेपणाविषयीं कींव दाखविण्याच्या ऐटीनेंच मोठीं माणसें बोलतात. प्रौढ बुद्धीला ज्या वस्तु नीरस व निरर्थक वाटतील त्यांत लहान मुलें, त्यांच्या अंगीं समज कमी असल्यामुळें, आनंद मानतात अशा प्रौढीची लकेर मोठ्या माणसांच्या कौतुकांत कित्येक वेळां असते. ऐन दुपारच्या प्रहरीं ओढ्याच्या कांठच्या सावलींत कांदाभाकर खातांना एखाद्या गुराख्याला पाहून शहरचा एखादा लक्ष्मीपुत्र त्याच्या साध्या समाधानाचें कौतुक करतो, तेव्हां आपलें स्वतःचें समाधान त्याच्यापेक्षां फार वरच्या दर्जाचें आहे अशी आढ्यता प्रच्छन्न रूपानें पण बऱ्याच अंशानें त्या कौतुकांत असते. आपल्या शहरच्या सुखविलासांची आणि वैभवाची त्या गुराख्याच्या गरिबीशीं अदलाबदल करतोस कां म्हणून कोणीं त्या लक्ष्मीपुत्राला

विचारलें तर त्याच्या कौतुकाचा झिरझिरीत पडदा फाटून आंतील आढ्यता उघडी पडावयास वेळ लागणार नाहीं. हीच गोष्ट लहान मुलांच्या साध्याभोळ्या वृत्तीचें कौतुक करणाऱ्या मोठ्या माणसांची पुष्कळ वेळां असते.

परंतु, तसाच विचार केला तर निरर्थक वस्तूंत आनंद मानणाऱ्या लहान मुलांहून आपला आनंद श्रेष्ठ दर्जाचा आहे असें मानण्याचा अधिकार मोठ्या माणसांना आहे काय? लहान मुलांना कमी समज असते असें समजणाऱ्या मोठ्या माणसांना मोठी समज खरोखरीच आलेली असते काय? प्रौढ माणसांची बुद्धि खरोखरच प्रौढ झालेली असते काय? त्यांच्या आनंदाचे व सुखाचे विषय होणारे सर्व पदार्थ सार्थ असतात काय? निरर्थक वस्तूंत प्रौढ माणसें आनंद मानीत नाहींत काय? सर्व प्रौढ माणसांना एकाच विषयापासून सारखाच आनंद लाभतो काय? एका प्रौढ माणसाचा सुखविषय दुसऱ्यास निरर्थक वाटण्यासारखा नसतो काय? कथापुराणांच्या नादानें घरचीं कामें टाकून धांवणाऱ्या बायका पुरुषांच्या मतानें टीकास्पद ठरतात; कोल्हापुरास कुस्तीची दंगल निघाली तर धंदा सोडून पुण्यामुंबईहून तिकडे जाणारे हौशी लोक पुष्कळांच्या दृष्टीनें मूर्ख ठरतात; आणि बालगंधर्वांच्या नाटकासाठीं शेंकडों मैलांवरून धांवत येणाऱ्या आणि पैशाच्या नोटांच्या वावड्या करणाऱ्या श्रीमंतांना भोंवतालचे किती तरी लोक बेअकली समजत असतात!

शिक्षणाच्या आणि सामाजिक दर्ज्याच्या भिन्नतेमुळें सुख-

विषयांची ही भिन्नता उत्पन्न होते असें मानण्यासही जागा नाहीं. शिक्षण, मनोविकास आणि श्रीमंती या सर्व दृष्टींनीं सारख्याच दर्जाचीं ठरतील अशा माणसांचे सुखविषयहि भिन्न भिन्न आणि परस्परांस निरर्थक वाटणारे असतात, हा नेहमींचा अनुभव आहे. एकाला काव्याची विलक्षण आवड असते, काव्यवाचना-पासून होणाऱ्या आनंदापुढें त्याला सारें जग तुच्छ वाटत असतें, आणि पोटच्या मुलापेक्षांही आपल्या काव्यग्रंथांना तो अधिक जपत असतो; तर उलट, कालिदासाच्या किंवा भवभूतीच्या नाटकांतील एखादा श्लोक पुनःपुन्हा मनाशीं म्हणून आनंदानें नाचणाऱ्या त्या गृहस्थाला पाहून दुसरा त्याची गणना शुद्ध मूर्खांत करावयास कमी करीत नाहीं. एखाद्याला संगीताविषयीं इतकी आसक्ति असते कीं, गायनवादनावांचून, नाहीं तर निदान त्याविषयींच्या गप्पा तरी मारल्यावांचून वालविलेली एक घटकाही त्याला असह्य वाटते. पण गवयाचें गायन एकाग्रतेनें ऐकत बसून त्याच्या गळ्यांतून निघणाऱ्या दर एक तानउपजेबरोबर "वाहवा" देतांना आणि माना डोलवितांना त्याला पाहून त्याचे कित्येक मित्र त्याच्या निरर्थक नादिष्टपणाची कींव केल्यावांचून राहात नाहींत. निदान आनंदानें बेहोष होण्यासारखें असें त्या गायनांत ग्रेवढें काय आहे, असें आश्चर्य त्यांना वाटल्याखेरीज राहात नाहीं. आणि खरेंच, संगीतलोलुपतेची दृष्टि सोडून क्षणभर विचार केला तर, संगीतांत येवढी मोहिनी ती काय आहे? क्रिकेटच्या चौरंगी सामन्यांतील एखादा डाव सुरू झाला म्हणजे क्रीडांगणावर

जाऊन पहावें. प्रत्यक्ष खेळणारांच्या ठायीं नसेल इतक्या ,तादात्म्य-वृत्तीनें पंधरावीस हजार प्रौढ प्रेक्षक खेळ पहात असतात, मोठमोठीं वयस्क माणसें आनंदातिशयानें उभीं राहून रुमाल हवेंत उडवीत असतात, टाळ्या पिटीत असतात, ओरडत असतात. त्यांच्या बाजूचा एखादा गडी पडल्याबरोबर त्यांचे चेहरे दुःखानें म्लान होतात, आणि त्यांच्या बाजूची सरशी होत असलेली दिसतांच त्यांना हर्षाचें भरतें येतें. पण त्रयस्थांना त्यांचा तो हर्षोन्माद वेडाच्या लहरीसारखा वाटतो. आणि तसाच विचार केला तर चेंडूफळीच्या त्या खेळांत येवढें स्वारस्य तें काय असणार? घोड्यांच्या शर्यती खेळणारांच्या स्पेशल गाड्या पुण्यास येऊन धडकण्याच्या वेळीं स्टेशनवर जाऊन घटकाभर उभें रहावें. चाळिशीच्या पुढें गेलेले, दाढीमिशा फुटलेले—नव्हे फुटणाऱ्या दाढीमिशा साफ काढणारे—आणि चारपांच मुलांचे आईबाप सहज शोभतील असे पुरुष लहान मुलांप्रमाणें गाडी उभी राहण्यापूर्वींच गाडींतून पटापट उड्या टाकून धांवत सुटतात; मोठमोठ्या श्रीमंतांच्या बायका लज्जा विनय टाकून पोरीसोरींसारख्या खिदळत आणि किंकाळ्या फोडीत शर्यतीच्या पटांगणावर त्वरेनें दाखल होण्यासाठीं गर्दींतून लोकांना धक्के देत वाट काढीत असतात; आणि इतर वेळीं ज्यांची क्षणभर भेट घ्यावयाची झाल्यास मोठमोठ्या लोकांनाही कचेरीच्या दारापाशीं घटकान्‌घटका तिष्ठत उभें रहावें लागतें असे बडेबडे कामदार लहानाहून लहान होऊन पळत असतात! आपल्या दृष्टीला तो

एकंदर गोंधळ शुद्ध वेड्यांचा बाजारसा वाटेल. आणि खरेंच! तसेंच पाहिलें तर साध्या घोडदौडीच्या त्या दंगलींत देहभान विसरण्यासारखें तें येवढें काय आहे?

प्रणयपाशांत सांपडलेल्या प्रौढ माणसांची गोष्ट तर बोलायासच नको. स्त्रीवर अनुरक्त झालेला कामी मनुष्य तिच्या पायधुळीचेंही चुंबन घेण्यास तयार असतो, आणि तिच्या प्राप्तीपुढें संपत्ति व कीर्ति या दोहोंचीही त्याला पर्वा वाटत नाहीं. परंतु ज्या स्त्रीविषयीं तो एवढा लंपटपणा करतो तिच्या स्वरूपाकडे पहावें तों त्यांत सौंदर्य सांपडेलच असें नाहीं. आणि जरी स्त्री सुंदर असली तरी, तसाच विचार केला तर, तिच्या प्राप्तीसाठीं माणसानें आपल्या सर्वस्वावर पाणी सोडावें येवढी त्यांत कोणती जादू आहे? परंतु असें असूनही प्रणयाच्या प्रवाहांत प्रौढ, सुबुद्ध आणि विद्वान माणसांची प्रौढ बुद्धि व विद्वत्ता वाहून गेल्याचीं उदाहरणें आपण प्रत्यहीं पाहतों. प्रत्येक देशाच्या इतिहासांत विश्वामित्र व मेनका यांच्या प्रणयप्रसंगाचें नाटक अनेक वेळां झालेलें दिसतें, आणि मानवजातीच्या अंतापर्यंत या नाटकाची पुनरावृत्ति पुनःपुन्हा होत राहणार.

सारांश, लहान मुलांच्या भोळ्या वृत्तीची कींव करणाऱ्या प्रौढ माणसांची स्थिति त्या मुलांहून निराळी नाहीं. या संसारांत लहान मोठा प्रत्येक मनुष्य कोणत्या तरी एखाद्या खेळण्याच्या नादीं लागलेला असतो. कोणी काव्याचा खुळखुळा करून त्याच्या नादांत असतो; कोणी शास्त्रीय शोधाची बाहुली घेऊन ती जन्मभर

उलटीसुलटी फिरवीत असतो; कोणी वेदान्ताचा आरसा घेऊन त्यांत आपलें स्वरूप सारखें पहात असतो; कोणी राजकारणाचीं घरकुलें बांधण्यांत, मोडण्यांत आणि पुन्हा उभीं करण्यांत दंग असतात; आणि कोणी एखाद्या जिवंत बाहुलीच्या नादीं लागून तिला वस्त्राभरणांनीं सजविण्यांत, तिच्याशीं प्रेमकलह करण्यांत, आणि तिचें परोपरीनें कोडकौतुक करण्यांत रमून जातात. बेगडी निरर्थक खेळण्यांत दंग होणाऱ्या बालकांहून आपली अभिरुचि अधिक समंजस व अधिक उच्च दर्ज्यांची आहे असें मानणारीं प्रौढ माणसेंही इतर प्रौढ माणसांच्या दृष्टीनें तशाच निरर्थक वस्तूंच्या नादीं लागलेलीं असतात. प्रौढ माणसांच्या व्यवहारांतील आनंदाच्या आणि उत्साहाच्या प्रत्येक ऊर्मीची गोष्ट अशी आहे कीं, सत्यासत्यतेची जराशी भिन्न कसोटी लावल्या बरोबर तो आनंद व उत्साह खोटा, निरर्थक, केवळ त्या त्या माणसानें आपल्या आवडीनें कृत्रिमपणानें उत्पन्न केलेला असा ठरेल.

मात्र याचा अर्थ असा नव्हे, कीं प्रौढ माणसांनीं हे विविध आनंद उपभोगूं नयेत. यांतील अभिप्राय इतकाच कीं, लहान मुलांच्या भाबड्या खेळाकडे पाहून त्यांना समज कमी आहे व आपल्याला जास्त आहे, अशा अभिमानाच्या व श्रेष्ठपणाच्या आविर्भावानें त्यांचें कौतुक करणारा प्रौढ मनुष्य मोठी चूक करीत असतो. बालक्रीडांतील साधेपणाच्या कौतुकाला असल्या हिणकस आविर्भावाचा विटाळ होतां कामा नये. उलट, साध्यासुध्या गोष्टींपासून सहज आनंद प्राप्त करून घेण्याची मुलांची वृत्ति

दृष्टीस पडली, कीं तिच्याविषयीं आपल्याला एक प्रकारचा हेवा व लोभ वाटला पाहिजे. " ही वस्तू माझ्याजवळ असती तर मी किती सुखी झालों असतों " असें एखाद्या वस्तूकडे पाहून म्हणतांना आपल्याला जें वाटतें तेंच या बालवृत्तीविषयीं वाटलें पाहिजे. ही एक बालवृत्ति आपल्याजवळ असेल तर आपल्या अंतःकरणाला घरें पाडणारी नाना प्रकारची सांसारिक चिंता आपल्याला शिवणार नाहीं, मनोभंगामुळें उत्पन्न होणाऱ्या निराशेची जखम खोलवर कधींच जाणार नाहीं, आणि दुःखाला क्षणार्धापेक्षां अधिक अवकाश आपल्या हृदयांत केव्हांही मिळणार नाहीं, अशा विचारानेंच आपण लहान मुलांच्या भाबड्या खेळांकडे पाहिलें पाहिजे.

कारण, त्या त्या वस्तूविषयीं त्या त्या वेळेपुरतें तादात्म्य ठेवून आनंदाचा उपभोग घेण्याच्या या बालवृत्तीमुळेंच संसार सुखमय होत असतो. ही बालवृत्ति ज्याच्याजवळ नसते त्याला संसारांत आनंद असूनही सांपडत नाहीं. संध्याकाळच्या तिरप्या उन्हांत पदार्थांच्या छाया दसपट मोठ्या दिसाव्या त्याप्रमाणें त्या मनुष्याला संसारांतील लहानसहान दुःखेंही प्रचंड आणि असह्य भासूं लागतात. पऱ्याच्या छपरावर पडलेली लहानशी सरही मुसळधार पावसासारखी वाटावी त्याप्रमाणें लहानशी निराशाही त्याला भेवडावूं लागते. भयाण देवळाच्या सभामंडपांत घोंटाळणारा वाऱ्याचा लहानसा स्रोत सूं सूं आवाज होऊन झंझावातासारखा वाटावा, त्याप्रमाणें दुर्दैवाचा विरुद्ध

वारा जरासा वाहूं लागतांच त्याला भयंकर वादळांत सांप-डल्यासारखें वाटून तो गांगरून जातो व हतबल आणि हतबुद्ध होतो. अशीं माणसेंच म्हणतात, संसार निःसार आहे.

उलट, लहान मुलांची निर्व्याज वृत्ति ज्याच्या अंतःकरणांत सदैव असते त्याच्या दृष्टीला संसारांतील दुःखें आकाशांत क्षणभर उठणाऱ्या जलहीन मेघांप्रमाणें दिसतात. त्या ढगांची भीति वाटण्याऐवजीं त्यांमुळें क्षितिजाच्या देखाव्यांत वैचित्र्याची भर पडल्यासारखें वाटलें पाहिजे अशी त्याची समजूत असते. अशा बालवृत्तीच्या मनुष्याचा आनंद अबाधित असतो, आणि संसार आनंदमय आहे असें तो आपल्या वर्तनानें लोकांना शिक-वीत असतो. इतकें त्या बालवृत्तीचें महत्त्व आहे. मग बाल-कांच्या खेळण्याचें कौतुक करतांना त्यांच्या मनाच्या निर्व्याज वृत्तीविषयीं आपल्याला हेवा व लोभ वाटला तर त्यांत वावगें तें काय आहे ? सबंध राज्याचें मोल देऊन ती बालवृत्ति विकत घ्यावयास राजानें तयार असावें, तिच्या वर्णनाचें सौख्य अनु-भविण्यासाठीं आपल्या सर्व प्रतिभेचा विनिमय करण्यास कवींनीं व कादंबरीकारांनीं तत्पर असावें, आणि तिच्या संपा-दनासाठीं तत्त्वज्ञांनीं आणि योग्यांनीं रात्रंदिवस झटावें, इतकें या बालवृत्तीचें मोल मोठें आहे. तिच्याविषयीं आपल्याला हांव आणि हेवा वाटतो हें कबूल करण्यांत सहृदय माणसाला नेहमीं धन्यताच वाटेल !

—फेब्रुआरी, १९२६

३

# अलंकार

तरुण मुलींनीं वेणी न घालतां अंबाडा घातला, अंबाड्यांत एखादें फूल खोंवलें, किंवा लुगड्याचे ओचे टांचेपर्यंत पायघोळ सोडले कीं, मोठ्या बायकांना तें आवडत नाहीं. " छे बाई ! हल्लींच्या या मुलींना भारीच नटायला पाहिजे ! " हा त्यांचा ठरलेला उद्गार आहे. तसेंच तरुण पुरुषांचे पोशाखही जुन्या पिढींतील माणसांना पसंत नसतात; आणि " पूर्वींचा साधेपणा या हल्लींच्या तरुणांनीं घालविला " अशी त्यांची ठरलेली टीका असते. पण नटण्याच्या सोसाचा आरोप ज्या तरुण मुलींवर होतो त्यांची व तो आरोप करणाऱ्या मोठ्या बायकांची तुलना केली तर त्या आरोपाला फारशी जागा उरेलसें वाटत नाहीं. कारण, तसेंच पाहिलें तर अलंकारांच्या ओझ्यानें शरीर कष्टविण्याचा सोस जुन्या बायकांच्या ठिकाणींच अधिक प्रमाणांत आढळून येतो. जुन्या तऱ्हेनें नटविलेली नवरी मुलगी, आणि नव्या चालीची नवरी मुलगी शेजारीं शेजारीं उभ्या करून

पहान्या म्हणजे आमचें म्हणणें कोणासही क्षणार्धांत पटेल. एक वेणींतील पांचपंचवीस सोन्याच्या फुलांपासून आणि गळ्यांतल्या सरीच्या कडकण्यापासून पायांतल्या सात आठ शेर वजनाच्या सांखळ्या-तोरड्यांपर्यंत दागिन्यांनीं मढविलेली, तर दुसरीनें गळ्यांतील व हातांतील थोड्याशा अलंकारांखेरीज बाकीच्या शृंगारसंभाराचा त्याग केलेला ! अशा स्थितींत तरुण पिढींतील मुलींना अलंकाराचा, नटण्याचा, अधिक हव्यास आहे असें कसें म्हणतां येईल ?

पुरुषांच्या बाबतींतही हीच गोष्ट खरी आहे. तरुण पिढींतील पुरुषांचीं रिस्टवॉचेस, त्यांचे वाढविलेले केस आणि गरम किंवा तलम कपडेलत्ते जुन्या माणसांच्या डोळ्यांवर येतात खरे; पण येवढ्यावरून जुन्या माणसांच्यापेक्षां हल्लींचे पुरुष अधिक नटतात असें सिद्ध होईल असें थोडेंच आहे ? आजचीं मनगटावरचीं घड्याळें म्हणजे एक प्रकारें जुन्या माणसांच्या मनगटावरच्या पोचीच होत. आज तरुण पुरुष केसांचा भांग काढतात तर पूर्वींचे लोक स्त्रियांप्रमाणें श्रोणीपर्यंत रुळणाऱ्या शेंड्या राखीत असत व त्या सुवासिक तेलांनीं माखून विंचरीत बसत असत. कपड्यांच्या बाबतींत तरी पूर्वींच्या वीत दीड वीत कांठाच्या रेशमी धोतर-उपरण्यांऐवजीं आणि पायघोळ अंगरख्याऐवजीं आज तलम धोतरें आणि आंखूड गरम कोट वापरले जात आहेत येवढेंच !

सारांश, अलंकारांच्या बाबतींत वृद्धांनीं तरुणांना, किंवा

जुन्यांनीं नव्यांना, हंसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आतां कोणत्या अलंकारांमुळें पैशाचा पाय घराबाहेर पडतो आणि कोणते अलंकार पैशाचा संचय करावयास उपयोगीं पडतात हा प्रश्न अगदीं निराळा. अलंकारांच्या विषयांत संचयाचा प्रश्न उपस्थित करणें चुकीचें आहे. सरकारी तिजोरींतील दहापांच सोन्याच्या चिपा एखाद्या जुन्या वळणाच्या बाईच्या डोक्यावर दिल्या तर त्यामुळें आपण अलंकृत होतों असें तिला वाटेल काय? पैसे सांचविण्याचा विचार अलंकारांच्या विवेचनांत तत्त्वशः येऊं शकतच नाहीं. अलंकार हे शरीराची शोभा वाढविण्यासाठीं आहेत. आणि या दृष्टीनें पाहिल्यास अलंकारांची हौस प्रत्येकाला आहे आणि असावी. त्या हौशीबद्दल दुसऱ्याला हंसणारा स्वतःच हास्यास्पद ठरेल.

कारण नटण्याची, स्वतःच्या शरीराची शोभा वाढविण्याची इच्छा मनुष्यस्वभावांत निसर्गानेंच ठेवलेली आहे. मनुष्यस्वभावांत कशाला, जरा खोलवर पाहूं गेल्यास प्राणिमात्राच्या बीजभूत प्रवृत्तींपैकींच ही नटण्याची प्रवृत्ति आहे असें दिसून येईल. प्राणिशास्त्रज्ञ असें सांगतात कीं, प्रत्येक प्राणिजातींतील नराच्या ठिकाणीं निसर्गानें अशीं कांहीं अंगोपांगें ठेवलेलीं असतात कीं, त्यांचा स्वतःच्या शरीराची शोभा वाढविण्याच्या कामीं, आणि तसें करून मादीचें मन प्रसन्न करण्याच्या कामीं त्यास सहज उपयोग होतो. याचें अगदीं सर्वोत्कृष्ट उदाहरण म्हणजे मोर व त्याचा पिसारा. मेघगर्जना ऐकल्याबरोबर प्रमुदित होऊन

मोर नाचत असेल; आणि मोराच्या पसरलेल्या पिसाऱ्याचें सौंदर्य पाहून कवींनाही काव्याची स्फूर्ति होत असेल. पण त्या पिसाऱ्याच्या मूळ हेतूचा मेघगर्जनेशीं, किंवा कवींच्या काव्यांशीं कांहीं एक संबंध नाहीं. लांडोरीला मोहित करून तिच्या मनांत आपल्याविषयीं आसक्ति उत्पन्न करावयाच्या प्रयत्नांत मोराला यश मिळावें यासाठीं निसर्गानें पिसाऱ्याचा अलंकार, व प्रणय-क्रीडेच्या वेळीं तो वापरण्याची प्रवृत्ति त्याच्या ठिकाणीं ठेवली आहे. मोराचीच अशी गोष्ट आहे असें नव्हे. सिंहाची भव्य आयाळ, बैलाचें ऐटबाज वशिंड, हीं सर्व त्या त्या प्राण्यांस निसर्गानें दिलेले अलंकार होत. श्वानाच्या वक्र पुच्छावर आपण एक निंदाव्यंजक म्हण बसवून ती रूढ केली खरी; पण त्या पुच्छाचा देखील निसर्गसिद्ध उपयोग वर सांगितला तोच नसेल कशावरून ?

मनुष्याच्या ठिकाणींही असे निसर्गसिद्ध अलंकार आहेत. पुरुषाच्या दाढीमिशा आणि स्त्रीचे पयोधर हे या अलंकारांपैकींच होत. फरक इतकाच कीं, पशुपक्ष्यांना निसर्गानें अलंकार व ते वापरण्याची प्रवृत्ति यांपलीकडे कांहींही दिलेलें नाहीं, आणि माणसाला मात्र अलंकार व शृंगारप्रवृत्ति यांखेरीज त्या दोहींचेंही वर्धन व नियंत्रण करावयास समर्थ अशी बुद्धि निसर्गानें दिली आहे. निसर्गानें मनुष्यास दांत, नखें अशीं आत्मसंरक्षणाचीं साधनें पशुपक्ष्यांच्यापेक्षां कमी दिलीं आहेत. कारण तीं साधनें जरी कमी मिळालीं असलीं तरी नवीं नवीं साधनें शोधून

काढणारी बुद्धि मनुष्यास दिलेली आहे. अलंकारांच्या बाबतींतही निसर्गानें अशीच योजना केलेली दिसते. निसर्गदत्त सौंदर्यावरच केवळ अवलंबून राहण्याचें मनुष्यास कारण नाहीं. निसर्गापासून मिळालेल्या अलंकारांची शोभा वाढविण्यास, त्यांची कौशल्यानें योजना करण्यास, किंवा त्यांत नव्या कृत्रिम अलंकारांची भर घालण्यास उपयोगीं पडेल अशी बुद्धि मनुष्याच्या सेवेला मिळालेली आहे. अगदीं निकृष्ट वर्गांतील प्राणी घेतले तरी स्त्रीजातीनें पुरुषजातीस आपापल्या अलंकारांनीं मोहित व आकर्षित करावें, आणि या आकर्षणाची सम्मीलनांत व प्रजाजननांत परिणति व्हावी असें निसर्गाचें सूत्र आहे. या सूत्रामुळेंच ती ती प्राणिजाति अवनीतलावर अक्षय टिकून राहते. या सूत्राचें उत्कृष्ट स्वरूप मनुष्याच्या ठिकाणीं आढळून येतें. मनुष्याच्या हृदयांतील अलंकारप्रवृत्तिच नाहींशी झाली तर स्त्री-पुरुषांच्या परस्पर आकर्षणाचाच अंत होईल, आणि प्रजाजननाची क्रिया थांबल्यावांचून राहणार नाहीं. प्रत्यक्ष मनुष्यजातीचें अस्तित्वच अलंकारांवर अवलंबून असल्याचें अशा प्रकारें उघड दिसत असतांना अलंकारांच्या आसक्तीबद्दल कोणीं कोणाला दोष देण्यांत सुज्ञपणा कोठें उरला ?

आणि शिवाय जीं माणसें दुसऱ्याच्या नटवेपणाला नांवें ठेवतात आणि स्वतःच्या साधेपणाची प्रौढी मिरवितात, त्यांच्या मनोवृत्तीची थोडीशी छाननी केली तर काय दिसून येईल ? तीं माणसें आपापल्या परीनें साधीं कां वागतात ? समजा, एक

जुन्या वळणाचे वयस्क गृहस्थ आहेत. त्यांना अलीकडील तरु-
णांच्या गुळगुळीत दाढ्या, वाढविलेले केस, कमी केलेल्या मिशा,
धोतराचे काचे, लांबसडक शर्ट आणि आंखूड कोट या सर्व गोष्टी
बिलकुल नापसंत आहेत. त्यांचा स्वतःचा पोषाख म्हणजे स्वच्छ
शुभ्रकांठी धोतर, शुभ्र सद्रा, पांढरा शुभ्र पायघोळ अंगरखा,
आणि सफेत रुमाल असा आहे. पण असा पोषाख हे गृहस्थ
कां करतात? कोणत्या मनोवृत्तीमुळें ह्यांना असा पोषाख
करावासा वाटतो? तरुणांच्या फॅशनेबल आखुड कोटांत आणि
यांच्या कफनीवजा अंगरख्यांत जितकें अंतर दिसतें तितकें
त्यांच्या व यांच्या मनोवृत्तींत अंतर असतें काय? आपण
चारचौघांत गेलों असतां आपण चांगलें दिसावें या हेतूनें तरुण
केसांचे भांग काढतात आणि कोटाची शिलाई अमक्याच
तऱ्हेची असावी अशी दक्षता ठेवतात; आणि हे गृहस्थ जरी
या दोन्ही गोष्टी तिरस्करणीय समजत असले तरी चारचौघांत
चांगलें दिसण्याचा हेतु यांच्याही मनांत असतो. कोणचे वस्त्रा-
लंकार घातले असतां लोकांना आपण चांगले दिसूं, याबद्दल
व्यक्तिव्यक्तींच्या विचारांत पुष्कळ फरक असेल, पण अलंकारांची
कल्पना—आपण लोकांना चांगलें दिसावें ही कल्पना—प्रत्येकाच्या
ठिकाणीं असतेच्च असते.

या दृष्टीनें पाहिलें असतां जवळ जवळ गुडघ्याइतक्या
आंखूड ओच्यांचें निरुंद लुगडें नेसून, हातांत गोठ, पाटल्या आणि
गळ्यांत सरी साज घालून, अनवाणी पायांनीं रस्त्यानें जाणारी

पन्नाशींतली बाई, आणि रस्त्यांतील केर काढणारे लांब सोगे सोडून, आणि पायांत चपल घालून ऐटीनें मुरडत चालणारी कोंवळ्या तारुण्यांतील अलीकडची मुलगी यांच्या मनोवृत्तींत कांहींच भेद मानण्याचें कारण नाहीं. अमुक मनुष्य फार साधा आहे असें कोणीं सांगितलें, कीं मी त्याच्याकडे निरखून पहात असतों, आणि त्याचे कपडे भडक रंगाचे किंवा नव्या तऱ्हेचे नसले तरी आपला साधा रुमालच कां होईना पण तोच डोक्या-वरून जरा वांकडातिकडा सरकला तर पुन्हा नीट करण्याची तत्परता दाखवितांना त्या मनुष्याला पाहिलें, कीं मला मनांतल्या मनांत हसूं येतें. आपण चांगलें दिसावें ही इच्छा प्रत्येकाच्या ठिकाणीं आहे. अलंकारांची आसक्ति मानवी स्वभावांत खिळलेली आहे. तिचें बीज प्रत्येकाच्या अंतःकरणांत असतेंच. तें आपल्या ठिकाणीं आहे असें कबूल करण्यांत कोणाला कमीपणा वाटण्याचेंहि कारण नाहीं.

एक गोष्ट मात्र आश्चर्य करण्यासारखी आहे. ती ही कीं, वास्तविक निसर्गसिद्ध अलंकारांचें संवर्धन करण्यासाठीं आणि त्यांत कृत्रिम अलंकारांची कुशलतेनें भर घालण्यासाठीं बुद्धि हें शस्त्र मनुष्याच्या हातीं मिळालें असतांना त्या शस्त्राचा उपयोग अगदींच भलत्या दिशेनें करण्यास मनुष्य कधीं कधीं प्रवृत्त होतो. निसर्गसिद्ध शरीरसौंदर्य ज्या योगानें अधिक खुलून दिसेल अशा योग्य कृत्रिम अलंकारांचा योग्य प्रमाणांत मनुष्यानें उपयोग केला तर निसर्गानें दिलेल्या बुद्धीचा त्यानें सद्व्यय

केला असें होईल. पण निरनिराळ्या लोकांच्या अलंकारांच्या कल्पना पहाव्या तों अशा सद्व्ययापेक्षां अपव्ययाचींच उदाहरणें अधिक दिसून येतात. “ पिंडे पिंडे रुचिर्भिन्ना ” हें तत्त्व खरें आहे यांत संशय नाहीं, आणि सर्व मानवी हृदयांत सारखीच असणारी अलंकारप्रवृत्ति प्रत्यक्षांत प्रगट होऊं लागतांच रुचि-वैचित्र्याप्रमाणें भिन्न भिन्न स्वरूपांत दिसावी हें साहजिकच होय, याबद्दलही वाद नाहीं. पण या रुचिभिन्नत्वासही मर्यादा व बंधन मानलेंच पाहिजे. तें बंधन हेंच कीं, ज्यायोगें आपल्या निसर्गदत्त शरीरसौंदर्याची हानि होईल अशा कृत्रिम अलंकारांची मनुष्यानें कधींही योजना करतां कामा नये. या दृष्टीनें पाहिलें असतां अलंकारांचे किती तरी प्रकार गर्हणीय ठरतील, आणि वस्त्राभरणांच्या कितीतरी पद्धति त्याज्य समजाव्या लागतील.

उदाहरणार्थ, आपल्या समाजांतील कांहीं बायका अलीकडे युरोपिअन बायकांची नक्कल म्हणून उंच टांचांचे बूट घालूं लागल्या आहेत. पण या बुटांनीं स्त्रियांच्या नैसर्गिक सौंदर्यांत कशी काय भर पडते हें उमगणें कठीण आहे. युरोपिअन लोक इतर कितीही बाबतींत आमच्यापेक्षां श्रेष्ठ असोत, स्त्रियांचा पोषाख ठरवितांना त्यांनीं यत्किंचितही कलाभिज्ञता दाखविलेली नाहीं येवढें खास. कच्छविहीन लांडा झगा नेसलेली, डोक्यावर शिसराएवढी टोपी घातलेली, कुचप्रदेशाप्रमाणें पाठीचाही अर्धा भाग उघडा टाकलेली, आणि एखादा शाळेंतील पोर किंवा डोंबारी

दोन बांबूंच्या घोड्यावर चालतो त्याप्रमाणें उंच टांचांचे बूट घालून चालणारी युरोपिअन स्त्री म्हणजे वस्त्रालंकारांनीं मूळ शरीरसौंदर्य मनुष्यास किती बिघडवितां येईल त्याची पराकाष्ठा दर्शविणारी चालती बोलती साक्षच होय! अशा स्त्रियांच्या वस्त्रालंकाराची नक्कल करण्याची बुद्धि आमच्या स्त्रियांस व्हावी हें दुर्दैव होय. बाकी परक्यांच्या अनुकरणाचा प्रश्न सोडून दिला आणि पूर्वापार चालत आलेली आपल्या स्त्रियांची शृंगारपद्धति पाहिली, तरी ज्यायोगें अलंकारांचा मूळ हेतु निष्फळ होतो अशा अनेक गोष्टी दाखवितां येतील. जुन्या पद्धतीची वेणी यांपैकींच होय. पांच-पंचवीस प्रकारचे अलंकार गळ्यांत घालणें, आणि बांगड्या, गोठ, पाटल्या इत्यादींची गर्दी हातांवर करणें हेही प्रकार यांतीलच होत. दागिन्यांची रास रचून गळ्याचें आणि हाताचें नैसर्गिक सौंदर्य पुरतें झांकून टाकण्याची कल्पना कोणीं काढली असेल ती असो.

आमच्या दक्षिणी स्त्रियांची नेसण्याची तऱ्हा ज्यानें कायम केली त्याची योग्यता मात्र व्यासवाल्मीकींच्या तोडीची मानली तरी त्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं. स्त्रीच्या तनुलतेच्या शोभेला योग्य जागीं उठाव देणारी, व देहाचा कोणताही विभाग उघडा पडूं न देतां प्रत्येक विभागाचें मनोहारित्व सुचविणारी चोळी लुगड्याची पद्धति ज्याला सुचली त्याच्या अंगीं परमावधीची रसिकता असली पाहिजे यांत संशय नाहीं. ही रसिकता कोणीकडे, आणि पुरुषांनीं आपल्या मिशांचें मुंडण करणें व स्त्रियांनीं आपला

केशभार कातरून टाकणें हे निसर्गानें दिलेल्या अलंकारांचीही छाटाछाट करणारे पाश्चात्य प्रकार, किंवा तत्सदृश आपल्या समाजांतील अलंकारप्रकार कोणीकडे! अलंकारसंवर्धनासाठीं दिलेल्या बुद्धीचा मनुष्यानें अशा रीतीनें दुरुपयोग केलेला दिसला म्हणजे त्या बुद्धीला कांहींतरी नियंत्रण घालण्याची जरूरी परमेश्वराला खचित वाटूं लागत असेल!

परंतु अलंकरणप्रवृत्तीच्या या विकृतीपेक्षां दुसरा एक विचार अधिक मनोरंजक आहे. तो हा कीं, प्रत्येक मनुष्याला नैसर्गिक सौंदर्य असावेंसें जें वाटतें, आणि तें असल्यास त्याची शोभा वाढविण्यासाठीं, किंवा नसल्यास त्याचा दोष झांकण्यासाठीं अलंकार धारण करण्याची तो जी इच्छा करतो ती कोणासाठीं? स्वतःसाठीं कीं लोकांसाठीं? आपण सुंदर "असावें" असें मनुष्याला वाटत असतें, कीं आपण सुंदर "दिसावें" अशी त्याची इच्छा असते? अलंकार धारण करण्याच्या क्रियेंतच कांहीं विशिष्ट सौख्य आहे, कीं तें लोकांच्या दृष्टीस पडून त्यांच्या मनांत असूया उत्पन्न केल्याच्या विचारांतच खरें समाधान आहे?

वरवर पाहिलें असतां असें वाटतें, कीं मनुष्य अलंकार धारण करतो ते स्वतःपेक्षां दुसऱ्याच्या दृष्टिसुखासाठींच. कारण, अलंकृत स्वरूपांत कोणाच्या तरी दृष्टीस पडण्याची अपेक्षा असली म्हणजेच मनुष्य अलंकारांची विशेष इच्छा करतो. मोठमोठ्या सार्वजनिक समारंभांच्या वेळीं किंवा लग्नकार्यासारख्या प्रसंगीं सर्व स्त्रीपुरुषांनीं आपापल्या परींनीं वस्त्रालंकारांनीं स्वतःस

विभूषित केलेलें असतें. पण हेच स्त्रीपुरुष घरीं गेले, कीं ते वस्त्रालंकार काढून ठेवतात. घरांतल्या घरांत आपण आपल्या पोषाखाविषयीं बेफिकीर असतों; पण बाहेर जावयाचें झालें, कीं त्याविषयीं थोडी तरी दक्षता ठेविली पाहिजे असें आपणांस वाटतें. एखाद्या स्त्रीला हिऱ्यांचा कुडीजोड आणून दिला आणि सांगितलें, कीं हीं कुडीं फक्त घरांत असतांना घालावयाचीं, तर त्या अटीवर त्या अलंकाराचा ती स्वीकार करील हें संभवनीय नाहीं. हिऱ्यांचीं कुडीं कानांत घालण्यापेक्षां तीं शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या नजरेस पडलीं व त्यांकडे पाहून त्यांनीं एकमेकांत त्यांविषयीं चर्चा केली हा विचार तिला सुखदायक असतो. मुंबईसारख्या शहरांत, जेथें चारचौघांच्या गांठीभेटी सारख्या व्हावयाच्या, तेथें आपण वस्त्रविभूषणांकडे जितकें लक्ष देऊं तितकें एखाद्या भिकार खेड्यांत, जेथें मनुष्यापेक्षां निसर्गाचाच सहवास अधिक होणारा असतो तेथें गेल्यावर द्यावेंसें आपल्याला वाटेल काय? या दृष्टीनें विचार केल्यास आपण सुंदर "असावें" यापेक्षां आपण सुंदर "दिसावें" अशीच मनुष्याची खरी इच्छा असते असें म्हणावेंसें वाटतें.

पण हें विधान सर्वांशानें खरें नाहीं. अलंकार लोकांनीं पाहिले म्हणजे आपल्याला समाधान वाटतें यांत संशय नाहीं. पण अलंकारांपासून होणारें सर्वच सौख्य असें उसनें किंवा परतंत्र आहे काय?

अलंकारांच्या अंगीं सौख्य देण्याचें स्वयंभू सामर्थ्य मुळींच

नाहीं काय? आपले अलंकार लोकांच्या दृष्टीस पडावेत अशी आपली इच्छा असते जरी खरें; आणि या इच्छेची पूर्तता म्हणजेच अलंकारांपासून होणाऱ्या सुखाचा बराचसा अंश होय हेंही जरी खरें, तरी केवळ अलंकार धारण करण्याच्या क्रिये-पासून आपल्याला कांहींच आनंद होत नाहीं काय? आपण आपल्या वस्त्रालंकारांची निवड कशी करतों? ती निवड कर-ण्याच्या वेळीं लोकांचें समाधान आपल्या डोळ्यांपुढें असतें कीं आपलें स्वतःचें? आपले अलंकार व आपला पोषाख शिष्टसंमत पद्धतीस—जिला फॅशन म्हणतात तिला—अनुसरून सामान्यपणें असतो खरा, पण त्यांतही शक्य तितकी आपली स्वतःची विशिष्ट आवडनिवड पुरविण्याचा आपला प्रयत्न असतोच. शिष्टसंमत तऱ्हेच्या अगदीं विरुद्ध आपण सहसा वागत नाहीं. पण या तऱ्हेनें घातलेल्या मर्यादेंतही आपल्यांपैकीं प्रत्येक जण स्वतःच्या स्वतंत्र आवडीला पूर्ण वाव देतच असतो. सोन्याच्या ऐवजीं कथलाचे दागिने कोणी अंगावर घालीत नाहीं. पण एकाद्या अलंकाराची घडण विशिष्ट तऱ्हेची झालेलीच आपणांस आवडत असेल, तर प्रचलित पद्धतीच्या विरुद्ध देखील आपण वागतों. इतकेंच नव्हे, तर कित्येक वेळां वस्त्रालंकारांच्या बाबतींत लोकांची आवडनावड न जुमानतां आपण आपली हौस पुर-विण्यास कमी करीत नाहीं. काळीं कुरूप माणसें वस्त्रालंकारांनीं खूप सजलीं म्हणजे लोकांना तीं चांगलीं दिसण्याऐवजीं हास्या-स्पदच वाटतात. पण असें असतांही तीं माणसें नटत सजत

असतातच ना ? यावरून वस्त्रालंकारांच्या बाबतींत स्वतःच्या समाधानाचाही बराचसा भाग आहे हें उघड होत नाहीं काय ? नकट्या नाकाला विशोभित दिसत असूनही नथ घालणारी स्त्री, उंसाच्या चिपाडासारख्या हातांवर वाकींचा सोस करणारी बाई, टक्कल पडलेल्या ताळूवरच्या चार केंसांना पोमेड लावून भांग काढणारा पुरुष, किंवा आधींच प्रमाणाबाहेर लहान दिसणाऱ्या डोक्यावर मारे जरीकांठी मंदिलाचा मजला रचणारा वऱ्हाडी, हीं सगळीं कसलीं उदाहरणें होत ? अलंकारांच्या योगानें लोकांप्रमाणेंच स्वतःचेंही आराधन मनुष्य करीत असतो नव्हे काय ? समाजाच्या अस्तित्वामुळें अलंकारप्रवृत्ति उत्तेजित होते; पण ती प्रवृत्ति माणसाच्या ठिकाणीं स्वतंत्रपणें असते, व इतर स्वाभाविक प्रवृत्ति तृप्त करण्यासाठीं ज्याप्रमाणें मनुष्य झटतो, त्याप्रमाणेंच याही प्रवृत्तीच्या तृप्तीसाठीं तो झटतो.. फुटलेल्या जहाजांतील एकटा एकच उतारू वांचला, आणि तो एखाद्या निर्जन बेटावर राहूं लागला तरी तेथेंही थोडेंसें स्वास्थ्य मिळतांच शरीराच्या शोभेकडे व अलंकारांकडे त्याचें मन वळेल यांत संशय नाहीं.

—मार्च, १९२६.

४

# ऐन पंचविशी

समुद्र अतिशय खवळलेला होता. वारा असा सोसाट्याचा सुटला होता, कीं किनाऱ्यावर उभ्या असलेल्या स्त्रियांना आपले पदर व केंस सांवरतां सांवरतां पुरेवाट झाली होती; आणि त्यांच्या त्या संभ्रमाकडे पुरुषमंडळींच्या चोरट्या नजरा पुनःपुन्हा धांवत होत्या. समुद्राच्या उसळत्या लाटा धांवत येत त्या किनाऱ्याच्या फरशीवर हापटत, तेव्हां मोठी गर्जना होई, आणि सफेत फेंसाच्या मोत्यांचे सरच्या सर हवेंत उंच उडत ! दूर क्षितिजापर्यंत दृष्टि फेंकली, कीं तांबूस, काळसर अशा पाण्याच्या प्रचंड प्रक्षोभाखेरीज दुसरें कांहीं दिसत नव्हतें. वर आभाळांत ढगांची गर्दी झाली होती आणि पावसाची मुसळधार केव्हां कोसळेल त्याचा नियम नव्हता. अशा वेळीं एक कोळ्याचा वीसपंचवीस वर्षांचा मुलगा एक लहानसा पडाव समुद्रांत लोटून मारे वल्हीं मारीत निघाला होता.

कांहीं वर्षांपूर्वी पाहिलेलें हें दृश्य मी कधींही विसरणार नाहीं.

त्या दृश्याची मला अनेक वेळां आठवण होते, आणि ती जेव्हां जेव्हां होते, तेव्हां तेव्हां मनांत असा विचार येतो, कीं मी चित्रकार असतों तर तें दृश्य चित्रफलकावर रंगवून ठेवलें असतें, आणि खालीं त्याचें नांव म्हणून लिहिलें असतें "ऐन पंचविशी!"

कारण, वादळी समुद्रांत पडाव चालविणारा तो कोळ्याचा मुलगा आणि संसारसागरांत आपल्या आयुष्याची नौका चालविणारा ऐन पंचविशींतील कोणताही तरुण या दोघांचें तंतोतंत साम्य आहे. पंचविशी म्हणजे उन्मादाचा ऐन मोसम. त्या वयांतील तरुणाचें आणि संथ विचाराचें क्षणभर पटावयाचें नाहीं. त्या वयांतील तरुणांना लोकांनीं—विशेषतः म्हाताऱ्या माणसांनीं—उतावळे म्हणावें हें ठरलेलेंच आहे. म्हाताऱ्यांच्या दृष्टीनें उगवत्या पिढींतील तरुण माणसें शहाणीं ठरणें जवळ जवळ अशक्यच असतें. ऐन पंचविशींतील तरुणांच्या ठिकाणीं अस्थिरता, चांचल्य, अविवेक इत्यादि दोषांचा संभारच म्हाताऱ्या माणसांच्या दृष्टीला दिसत असतो. कोणत्याही म्हाताऱ्या मनुष्याला तरुणांच्या विषयीं मत विचारा, कीं त्याचें मत रडगाण्याच्या स्वरूपाचें असावयाचें, आणि त्या रडगाण्यांत "आम्ही तरुण होतों तेव्हां असें नव्हतें!" हें पालुपद पुनःपुन्हा यावयाचें याबद्दल शंकाच नको. "हल्लींचे तरुण" या शब्द-प्रयोगाला मुळीं जवळजवळ अपशब्दाचें स्वरूप प्राप्त झालेलें आहे. तरुण पिढीच्या कोणत्याही कृत्याबद्दल अभिनंदनाचे उद्गार म्हाताऱ्या माणसाच्या तोंडून सहसा निघावयाचे नाहींत.

आजच्या एखाद्या तरुण वक्त्याच्या स्फूर्तिदायक आणि श्रुतिमनोहर वक्तृत्वाबद्दल आपण बोलणें काढलें, कीं ते म्हणतील " छे! हल्लींच्या लोकांनीं काय व्याख्यानें द्यावीं? व्याख्यानें ऐकावींत तर तीं माधवराव रानड्यांचीं किंवा कुंट्यांचीं! काय महाराज त्यांच्या विद्वत्तेचा अन् वक्तृत्वाचा ओघ! ओहोहो–हो!" एखाद्या तरुण नटाच्या मार्मिक अभिनयाची स्तुति त्यांच्या देखत झाली, कीं ती ते स्वस्थपणें कधींही ऐकून घ्यावयाचे नाहींत. ते लगेच म्हणतील " छे! अलीकडे अभिनय उरला आहे कुठं? भाऊ गेला अन् त्याच्याबरोबर गाणं, अभिनय, सगळं कांहीं गेलं!" आजच्या पिढींतील एखादा कीर्तनकार कितीही विद्वान आणि कीर्तनकुशल असला, तरी त्यांचे आपले इचलकरंजीकरच एकमेवाद्वितीयम् होऊन गेलेले असावयाचे! आजचा एखादा तंतकार कितीही तयार असला तरी त्यांच्या वेळच्या इनायतुल्लापुढें त्याची कांहींच मातबरी नसावयाची! एखाद्या तरुण पखवाजीनें वाजविण्याची हद्द केली तरी त्यांच्या त्या गणू गुरवाचा बाज नेहमीं अलौकिकच रहावयाचा!

सारांश, तरुण पिढीच्या व्यवहाराकडे पाहण्याची म्हाताऱ्यांची दृष्टिच कांहीं निराळी असते. तरुणांच्या व्यवहारांत त्यांना जिकडे तिकडे अविचार भरलेला दिसत असतो. तरुणांचें बोलणेंचालणें, लिहिणेंवाचणें, प्रत्येक गोष्ट त्यांना चुकीची दिसत असते. आपल्या काळांत जगाचा गाडा सुरळीत चालला होता, आणि आज तो रुळावरून घसरून भलत्या चकारींतून

भडकत आहे, ही त्याची खात्री असते. तरुणांच्या नव्या चाली-रीती त्यांना दोषास्पद दिसतात, इतकेंच नव्हे तर नव्या काळांतील निसर्गाची वागणूक देखील त्यांच्या मनास येत नाहीं. त्यांच्या वेळचा वसंत कांहीं औरच होता; त्यांच्या काळांतील वर्षाकालची मजा कांहीं निराळीच होती. ते तरुण होते त्या वेळीं शरद् ऋतूंतील चंद्रकोर कांहीं विशेषच आल्हाददायक होती; आणि आतां निसर्गांत ती रमणीयता उरलेली नाहीं, असें त्यांना मनापासून वाटतें. नव्या काळाविषयीं इतकें असमाधान असल्यावर म्हाताऱ्या मंडळींना ऐन पंचविशींतील तरुणांच्या कृत्यांना अविचाराची कीड लागलेली दिसली तर त्यांत नवल तें काय ?

नवल हेंच, कीं तरुण त्याचें नवल करतात. तशाच थंड दृष्टीनें तरुणांच्या व्यवहारांकडे पाहिलें तर खरोखरीच त्यांत अविचाराचा भाग नसतो काय ? त्यांच्या प्रत्येक कृत्यांत उच्छृं-खलपणा दिसून येत नाहीं काय ? ते ऐन गर्दींतूनही चालतांना झपाझप चालतील, ठेंच लागून पडतील, किंवा आपल्या धक्क्यानें दुसऱ्याला पाडतील आणि पुन्हा पहिल्याप्रमाणेंच चालूं लाग-तील. आपलें बोलणें ते कोणाला समजून सांगणार नाहींत, आणि दुसऱ्याचें बोलणें ते कधीं धड ऐकूनही घेणार नाहींत. त्यांना राग आला, कीं त्याच्या भरांत ते परिणामाचा विचार करणार नाहींत; त्यांना दुःख झालें, कीं त्यांत ते सर्वस्वीं बुडून जातील; आणि त्यांच्या प्रणयाची गोष्ट तर विचारावयास नको !

प्रियाराधन करण्यांत ते वेड्यासारखे वागतील एवढेंच नव्हे, तर प्रेमविषयाची निवड करतांनाही ते काडीमात्र विवेक करणार नाहींत. अशा गोष्टींत एकीकडे अविचार करीत असतांना दुसरीकडे त्याबद्दलची कबुली स्वतः तेच देतील. इतकेंच नव्हे, तर त्या अविचाराबद्दल थोडासा अभिमानही त्यांना वाटेल. मग अविचाराबद्दल तरुणांना दोषी ठरविल्यास त्यांत म्हाताऱ्या माणसांची काय चूक आहे ?

ही विचारसरणी ग्राह्य झाली असती. पण ती पटत नाहीं याला एक मोठें कारण आहे तें हें, कीं आज तरुणांना अविचारी म्हणणारे वृद्ध स्वतः अविचारी तारुण्यांतून एकदां गेलेले असतात. आज संथपणानें आणि सावधगिरीनें चालणाऱ्या वृद्धांनीं एकदां उतावळेपणानें धांवपळ केलेली असते. आज ज्यांच्या अंगीं विवेकाची नम्रता आलेली आहे, त्या वृद्धांनीं अभिमानाचा ताठा एकदां जगाला दाखविलेला असतो. आज राग आला असतां दहा अंक मोजणाऱ्या वृद्धांनीं एकदां क्षणार्धांत रागाची गुलामगिरी पत्करलेली जगानें पाहिलेली असते. आणि आज तरुणांच्या उच्छृंखल प्रणयाला हंसणाऱ्या वृद्धांची विवेकभ्रष्टता एकदां मदनाच्या स्मरणवहींत नोंदली गेलेली असते. सारांश, काशी क्षेत्रांत येऊन पोहोंचल्यावर शांत आणि गंभीर प्रवाहाची झालेली गंगा ज्याप्रमाणें मागें कोठें तरी उथळ पात्रांत खळखळाट करीत, नाचत, आलेली असते, याप्रमाणेंच वृद्ध माणसांची स्थिति असते. परंतु वृद्ध माणसांना इतर सर्व प्रकारचा विवेक सुचला, तरी एवढा

विवेक कधींच सुचावयाचा नाहीं, आणि त्यामुळें ऐन पंचविशींतील तरुणांच्या व्यवहारावर त्यांच्या टीकास्त्राचा वर्षाव सदा चालू राहणार !

खरा उपाय म्हणजे, ऐन पंचविशींतील तरुणाचा दृष्टिकोण आणि साठींतील वृद्धाचा दृष्टिकोण सारखे असणें अशक्य आहे. हें दोघांनींही सदैव लक्षांत ठेवावें; आणि वृद्धांच्या हळुवार स्वभावाबद्दल तरुणानें, किंवा तरुणांच्या उतावळ्या स्वभावाबद्दल वृद्धानें नाक मुरडण्याचें सोडून द्यावें, हाच होय. कारण, वृद्ध आणि तरुण हे एकाच दुनियेंत वावरत असलेले किंवा एकाच परिस्थितींत रहात असलेले वरवर दिसले, तरी वस्तुतः पाहतां त्यांचें प्रत्येकाचें जग भिन्न भिन्न असतें. माणसाचा व्यवहार बाह्य वस्तूंच्या स्वभावापेक्षां त्याच्या अंतःकरणाच्या वृत्तीप्रमाणें घडत असतो. जडवादाचा कोणी कितीही अभिमानी असला, आणि त्या वादांत सत्याचा अंश कितीही असला, तरी इतकें खास, कीं प्रतिक्रियेच्या न्यायानें मनुष्याची या जगाशीं जी वागणूक होत असते, तिचें स्वरूप बहुतांशीं प्रत्येक मनुष्याच्या मनाची त्या त्या क्षणीं जी क्रिया चालू असेल तिच्यावरच अवलंबून असतें. ही गोष्ट लक्षांत ठेवली म्हणजे वृद्ध व तरुण यांच्या मनोभूमिकाच निसर्गनियमानुसार भिन्न असल्यामुळें त्यांचे जगांतील व्यवहार भिन्न स्वरूपाचे असणारच, हें चटकन पटण्यासारखें आहे.

तरुणाच्या मनाचा ताजेपणा वृद्धाच्या अंगीं कसा येणार ?

आणि वृद्धाच्या मनाची विगलितता तरुणान काय म्हणून पत्क-रावी ? नव्या दमाचा घोडा गाडी भरधांवच ओढणार, आणि एखाद्या वेळीं रस्त्यापासून आजूबाजूला तो ती थोडीशी तरी नेणारच. उलट थकलेला घोडा मुकाट्यानें पायबंद लावून घेऊन ठाणावर उभा राहणारच. आणि तद्वतच एकाच जगाशीं वृद्धाचें वर्तन धिमेपणाचें, तर तरुणाचें वर्तन मस्तपणाचें असणारच. त्या दोघांच्या मनोवृत्ति इतक्या भिन्न असतात, कीं एकाच विषया-वरच्या त्यांच्या विचारांत फरक पडतो, आणि एकाच वस्तू-विषयींच्या त्यांच्या आवडीनिवडींत भेद झाल्यावांचून रहात नाहीं. एका ग्रंथकाराचें तर असें म्हणणें आहे, कीं तरुण आणि वृद्ध या दोघांचीही गणना एकाच मनुष्यजातींत करण्याचें वास्तविक कांहींच कारण नाहीं. पक्ष्याला जें हवें असतें तें पशूला नको असतें, आणि पशूच्या आवडीनिवडींहून माणसाच्या आवडी-निवडी निराळ्या असतात, हें पाहून पशु, पक्षी व मनुष्य या वेगवेगळ्या जाति होत, असें जर आपण मानतों, तर त्याच न्यायानें तरुणांची व वृद्धांची जाति भिन्न भिन्न होय असें समज-ण्यास कोणती हरकत आहे, असा त्याचा प्रश्न आहे. आणि या त्याच्या विचित्र सूचनेबद्दल कोणास शंका वाटत असेल तर पुराव्यादाखल वाटेल तितक्या गोष्टी सांगण्याची त्याची तयारी आहे. पक्ष्यांना आवडणारें अन्न माणसांना आवडत नाहीं त्याच-प्रमाणें तरुणांना रुचिकर वाटणारे पदार्थ म्हाताऱ्यांना रुचिहीन वाटतात. तरुणांना रमणीय वाटणारे देखावे वृद्धांना आकर्षक वाटत

नाहींत. तरुणांना वेड लावणारें स्त्रीसौंदर्य वृद्धांना---पण या ग्रंथ-काराचा हा समग्र पुरावा ऐकून आपल्याला काय करावयाचें आहे? आपला मुद्दा एवढाच कीं, तरुणांचा आणि वृद्धांचा जगाकडे पहाण्याचा दृष्टिकोणच भिन्न असल्यामुळें, आपल्या व्यवहारावर वृद्धांनीं टीका केली तरी त्यांत नवल नाहीं, हें तरुणांनीं ध्यानांत ठेवावें आणि त्या टीकेचा राग मानूं नये.

आणि कांहीं झालें तरी ऐन पंचविशीचें वैभव इतकें मोठें आहे, कीं त्या वैभवांत राहणाऱ्या तरुणांना वृद्धांच्या टीकेचा वार लागण्याचें कारणच नाहीं. त्यांनीं आपल्या आनंदांतच गर्क असावें आणि त्या वारांची उपेक्षा करावी, इतकें तें वैभव उन्मादकारक आहे. ऐन पंचविशी ती ऐन पंचविशी! तिची सर दुसऱ्या कोणत्याच वयाला यावयाची नाहीं! पंचविशी हें असें वय आहे कीं, त्या वयांत क्षितिज लांब वाटत नाहीं, आकाश आटोक्याच्या पलीकडचें वाटत नाहीं, सागर अथांग वाटत नाहीं—सृष्टींतील कोणतीही वस्तु किंवा व्यक्ति आपल्याला मिळवितां येणार नाहीं अशा स्वरूपाची भासत नाहीं! तें वयच असें आहे, कीं त्या वयांत जगाच्या दृष्टीला कदाचित् वेडेपणाच्या वाटतील असल्या गोष्टी आपल्याला कराव्याशा वाटतात, आणि त्या कर-ण्याची धमक आपल्या शरीरांत असते. त्या वयांतच नदीच्या पुरांत उड्या टाकून पोहण्याचें सौख्य उपभोगतां येतें; कोठें आग लागलेली ऐकली तर ती विझविण्यासाठीं दोन दोन मैल आपण धांवत जातों; उत्तम क्रिकेटचा सामना पहावयास मिळावा

म्हणून झाडाच्या फांद्यांवर चढून बसण्यांत शरम वाटत नाहीं; दंगल, कुस्त्या, आखाडे यांच्या षोकानें आपण शुद्धबुद्ध विसरतों; गर्दीच्या डब्यांत खुशाल घोरत पसरलेल्या पठाणाला दोन ठोसे देऊन उठविण्यास आपण कमी करीत नाहीं ! त्या वयांत च आपण काव्य वाचतों, काव्य करतों, आणि काव्य आचरणांत आणतों ! फक्त जगांत जें आढळतें त्याचा उपभोग घेऊनच जिवाचें समाधान होत नाहीं तें त्या वयांतच; आणि सृष्टिकर्त्याच्या सृष्टींतील उणीव भरून काढण्यासाठीं मनुष्याच्या कल्पनेची भरारी आदर्शभूत स्त्रीपुरुषांचीं आणि सुखविलासांचीं चित्रें काढते ती त्या वयांतच !

ऐन पंचविशींतच आपण भविष्य काळाच्या अफाट विस्तारांत मनानें विहार करतों, नाना प्रकारच्या घडामोडींचे मनोरे तेथें उभे करतों, आणि आशा, स्फूर्ति, धैर्य, अधीरता, हे भडक रंग उधळून तो सारा विस्तार मनोहर करून सोडतों ! परकीय सत्तेचा जुलूम ज्या वयांत शल्यासारखा असह्य होतो ती ऐन पंचविशीच, आणि ती सत्ता कितीही प्रचंड आणि अजिंक्य दिसत असली तरी तिचा भेद आपण करूं शकूं, अशी खात्री वाटते ती ऐन पंचविशींतच ! या ऐन पंचविशींतच मूठभर मावळ्यांनिशीं मुसलमानी सेनेचा विध्वंस करतां येतो, ऑस्ट्रियन बादशाही उलथून पाडून संयुक्त इटलीचें साम्राज्य स्थापण्याच्या कल्पना मनांत येतात, आणि अभेद्य व अमर्याद सत्ता धारण करणाऱ्या झारशाहीच्या सिंहासनाखालीं देखील स्वातंत्र्यप्रीतीच्या विचा-

रांचा भडका उडवून देऊन तें उलथून पाडतां येईल याविषयीं शंका वाटत नाहीं! या वयांत इतरांना उघड दिसणाऱ्या गोष्टी माणसाला दिसत नाहींत हें खरेंच; पण इतरांना न दिसणाऱ्या गोष्टी माणसाला उघड दिसतात हें तर त्याच्याहूनही अधिक खरें! लोकांना दिसणाऱ्या अडचणी दिसत नाहींत, पर्वता-एवढालीं संकटें ठेंगणीं वाटतात, व शत्रूंच्या छळाचा समुद्र गुडघ्याइतकाच खोल वाटतो!

ऐन पंचविशींत या वास्तविक जगांत राहण्याऐवजीं, कल्पना, ध्येयें, व्यूह, शोध यांनीं गजबजलेल्या निराळयाच एका सृष्टींत आपण वावरत असतों. कल्पना आणि विकार यांचे वारे सुटलेले असतात, आणि त्यांच्या झोताबरोबर वास्तव जगाच्या मर्यादा आपण केव्हांच उल्लंघून जातों. खऱ्या निस्सीम प्रेमाची ऐन पंचविशींतच ओळख होते, आणि पर्शिनय कवि उमर खय्याम म्हणतो त्याप्रमाणें, प्रिया जवळ असली म्हणजे साधी भाकर आणि मद्यासवाचा घट एवढ्यावरच नंदनवनाचेंही सौख्य तुच्छ मानावयास प्रियकराची तयारी असते! स्वातंत्र्याच्या ध्येयाचें दर्शन ऐन पंचविशींतच होतें, आणि तें झाल्याबरोबर "मरेन किंवा मारीन" असा उन्माद मनुष्याच्या अंगांत चढतो. नवीन शास्त्रीय शोधांचे प्रांत ऐन पंचविशींतच दृष्टीस पडतात, आणि त्या प्रांतांत पाऊल टाकण्यासाठीं सारें आयुष्य खर्चण्यास मनुष्य तयार होतो!

सारांश, प्रत्येक महत्कार्याच्या मुळाशीं ऐन पंचविशींतलीं

बेफिकीरच असते. शास्त्र, कला, समाजरचना, राजसत्ता या सर्व गोष्टींतील क्रान्ति घडवून आणणारी शक्ति म्हणजे ऐन पंचविशीची अविचारी धडाडीच असते! ऐन पंचविशींतील तरुणांचे अविचार चालू आहेत म्हणूनच जगाची प्रगति चालू आहे, जुने शोध टाकाऊ ठरत आहेत, ज्ञानाच्या खाणींतून नवीं रत्नें बाहेर पडत आहेत, जुन्या संस्था जाऊन नव्या उदयास येत आहेत, सुधारणेचें पाऊल पुढें पडत आहे, आणि "एवं प्रवर्तितं चक्रम्" असा ज्याचा भगवानांनीं उल्लेख केला आहे, तें चक्र अव्याहत चालू आहे! म्हणून ऐन पंचविशीचें वैभव कांहीं और आहे. मानवी आयुष्यांत बालपणाचाच काळ सर्वांत रम्य होय, असें म्हणण्याची चाल कवींनीं पाडली असली तर असो; पण वरील गोष्टी ध्यानांत घेतल्या म्हणजे बालपणापेक्षांही ऐन पंचविशीचें वैभव अधिक मोठें आहे असें कोणीही म्हणेल. बालपणांत जग जें आपल्याला देईल तें स्वीकारणें भाग असतें. उलट ऐन पंचविशींत आपल्याला हव्या त्या गोष्टी जगानें दिल्या पाहिजेत अशी आपली मागणी असते, आणि जगाच्या तुटपुंज्या संपत्तींत उणीव दिसली, कीं ती भरून काढण्याचा आपला उद्योग असतो. ऐन पंचविशी जगाकडे नुसत्या प्रेक्षकाच्या दृष्टीनें पहात नाहीं; तर जगाला हवें तसें बनविण्यासाठीं ती जगाशीं खेळत असते!

—एप्रिल, १९२६

५

# अज्ञानाची महति

एका ग्रंथकारानें–मला वाटतें अनातोल फ्रान्स यानें–एके ठिकाणीं असें म्हटलें आहे, कीं एखादा गृहस्थ पंडित आहे असें मला समजलें, कीं त्याचा स्नेह संपादन करण्याची माझी सारी इच्छा मावळते. या ग्रंथकाराच्या मनांत पंडितांविषयीं एवढी अढी कां असावी तें निश्चयानें सांगणें कठीण आहे. पण एवढें खचित, कीं पांडित्याविषयीं वृथा मोह लोकांच्या मनांत इतका रुजला आहे, कीं त्या मोहावर उपाय म्हणून अज्ञानाच्या महतीविषयीं चार शब्द त्यांस सांगून पहावें असें वाटल्यावांचून रहात नाहीं.

ज्ञानप्राप्तीसाठीं मनुष्याची अहोरात्र चाललेली धडपड चहूं-बाजूंना दिसत असतांना अज्ञानाच्या महतीविषयीं बोलणें जरासें चमत्कारिकच. शाळाकॉलेजांची–म्हणजे पंडित निर्माण कर-णाऱ्या कारखान्यांची–संख्या वाढत आहे, शिक्षण अनेक ठिकाणीं मोफत व क्वचित् ठिकाणीं सक्तीचें होत आहे, आणि विश्व-

विद्यालयांच्या परीक्षांना बसणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या एखाद्या शहरची लोकसंख्या म्हणून सांगितली तरी शोभेल अशा प्रमाणांत फुगत आहे. हीं लोकांच्या वाढत्या ज्ञानलालसेचीं लक्षणें स्पष्ट दिसत असतांना अज्ञानाची महती सांगूं पहाणें धाडसाचेंच ठरेल. अणुपरमाणूंची रचना समजून घेण्यासाठीं शास्त्रज्ञ आपापल्या प्रयोगशाळांत डोळ्यांना सूक्ष्मदर्शक यंत्रें चोवीस तास लावून बसले आहेत, उत्तर ध्रुवाच्या शोधार्थ धाडसी प्रवासी आपले प्राण गमावण्यासही कचरत नाहींत, विविध विषयांत पारंगतता संपादन करण्यासाठीं लोक मोठमोठ्या ग्रंथसंग्रहालयांच्या दिवाणखान्यांत भोंवतालचें जग विसरून जाड्या जाड्या ग्रंथांत डोकीं खुपसून बसले आहेत, आणि सामान्य जनसमूहाला शहाणपणा यावा म्हणून वर्तमानपत्रांच्या कचेरींत संपादक आपली लेखणी अखंड शिणवीत आहेत, व खिळे जुळविणारांचे हात सारखे काळे होत आहेत—अशा परिस्थितींत अज्ञानाची महति सांगून पांडित्याची व विद्वत्तेची किंमत कमी करूं पाहणें यासारखें दुसरें हास्यास्पद काय असूं शकेल ?

पण क्षणभर असा विचार कां करूं नये, कीं ज्ञानाबद्दलचा मनुष्याचा हा हव्यास सर्वस्वी स्पृहणीयच आहे काय ? ज्ञानामागें धांवणाऱ्या लोकांचें सर्वस्वी अभिनंदनच केलें पाहिजे काय ? कांहीं दृष्टींनीं अज्ञानही प्रशंसनीय व सुखाचें नाहीं काय ? पंडितांच्या पांडित्यांत दूषणीय असें कांहींच नाहीं काय ? विद्वानांच्या विद्वत्तेबद्दल आपल्याला नेहमीं मत्सरच वाटला पाहिजे

काय ? पंडितांचें ज्ञान आपल्या ठिकाणीं नाहीं तेंच बरें, असें सामान्य मनुष्याला म्हणतां यावयास जागाच नाहीं काय ?

या दृष्टीनें विचार करून पंडितांची स्थिति स्पृहणीय आहे कीं नाहीं हें पाहूं लागल्यास पहिली गोष्ट मनाला पटते ती ही, कीं पंडित दोन प्रकारचे असतात. कांहीं पंडितांना ज्ञान मिळवि-ण्याची इच्छा असते, आणि बाकीच्या पंडितांना ज्ञान मिरवि-ण्याची हौस असते. यांपैकीं दुसऱ्या प्रकारच्या पंडितांचें बोलणें चालणें मोठें पाहण्यासारखें असतें. त्यांची भाषा कधीं साधी नसावयाची, तींत संस्कृत किंवा इंग्रजी कुलोत्पन्न जाड जाड शब्दांचा खूप भरणा असावयाचा. सामान्य माणसाशीं बोल-तांना देखील एखाद्या ग्रंथकाराचे विचार उध्दृत केल्यावांचून ते रहावयाचे नाहींत, रस्त्यांतून जातांना त्यांचे हात कधीं रिकामे दिसायचे नाहींत, चार पांच तरी लठ्ठ ग्रंथांचा संभार त्यांच्या खाकेंत दृष्टीस पडेल, कोणत्याही ग्रंथांतील विषय त्यांना नीट माहीत नसेल, पण किती ग्रंथांचीं व ग्रंथकर्त्यांचीं नांवें त्यांना मुखोद्गत असतील त्याला सीमा नाहीं. कोणत्याही विषयावर मत द्यावयास ते कचरणार नाहींत. चलनी नाण्यांच्या प्रश्ना-पासून तों लस टोंचण्याच्या दुष्परिणामापर्यंत वाटेल त्या विषयावर लेख लिहावयास ते धजतील. ते केव्हांही सभेंत बोलावयास उठले, कीं त्याच दिवशीं दुपारीं कोणता तरी ग्रंथ चाळीत असतांना अमुक मजकूर वाचल्याचें सांगितल्याशिवाय ते राहणार नाहींत. कोणी त्यांच्याकडे बोलाबसायला गेला तर

" बिझी " असल्याचें ते हटकून सांगतील. अमुक ग्रंथ वाचावयाचा आहे, तमुक लेख लिहावयाचा आहे, असा आपल्या पांडित्याचा संसार पसरून राहिला असल्याचा देखावा ते सदा दाखवितील. सारांश, जगानें आपल्याला पंडित म्हणावें एतदर्थ जें जें करणें आवश्यक आहेसें त्यांना वाटेल तें तें ते करतील. अशा पंडितांची मला मनापासून चीड येते. ते विद्वान तर नसतातच, पण प्रामाणिकही नसतात.

दुसऱ्या प्रकारचे पंडित प्रामाणिक असतात. ज्ञान मिरविण्यासाठीं नव्हे तर मिळविण्यासाठीं ते अहर्निश झटत असतात. पण त्यांची तरी अवस्था काय मोठी स्पृहणीय असते? बालपणापासून वार्धक्यापर्यंत त्यांचा सारा काळ ज्ञानार्जनांत गेलेला असतो, हें कोणाच्या दृष्टीनें अभिनंदनीय असेल तें असो! मला तरी तें तसें वाटत नाहीं खास. चोवीस तास पुस्तकांत तोंड खुपसून बसणाऱ्या मुलाची प्रशंसा कां करावयाची? अशा मुलानें विद्या कितीही चांगली केली तरी त्यानें आपलें बालपण सार्थकीं लावलें असें कां म्हणावयाचें? अशा मुलाचा वर्गांत पहिला नंबर असेल, पण त्याच्या त्या ज्ञानापासून जो आनंद त्याला होतो त्याच्या सहस्रपट अधिक आनंद इतर खोडकर विद्यार्थ्यांचें अज्ञान त्यांना देत असतें. उन्हाळ्याच्या सुटींत ऐन दुपारीं एखाद्या गांवाबाहेरच्या विहिरींत डुंबण्यांत आणि संध्याकाळीं कोणत्या तरी आंबराईंत शिरून हिरव्या कैऱ्यांचा मनःपूत समाचार घेण्यांत काय आनंद असतो त्याची कल्पना त्याचें भूगोलाचें

ज्ञान त्याला कोठून देणार ? पावसाळ्याच्या दिवसांत नदीला पूर आला म्हणजे शाळा चुकवून तो पहावयास जाण्यांत, आणि जातां येतां चिंब भिजण्यांत जें सौख्य असतें त्याचा अनुभव त्याचें अंकगणितांतील पारंगतत्व त्याला कसें देईल? किंवा चांदण्या रात्रीं निघून मन मानेल तशीं गाणीं गात, वाटेल तेथें थांबत, आणि लहर येईल तसें धांवत सवंगड्यांबरोबर सिंहगडची सफर करून येण्यांत जो आल्हाद आहे तो त्याच्या इतिहासाच्या ज्ञानांत त्याला कसा मिळेल?

पांडित्याच्या व ज्ञानाच्या मागें लागलेल्या माणसाचें बालपणच असें जातें असें नव्हे, तर तारुण्यांत व मध्य वयांतही संसारांतील विविध सुखांना तो असाच पारखा होतो. बीजगणिताचें परिपूर्ण ज्ञान करून घेण्यांतच त्यानें सर्व आयुष्य घालविल्यामुळें खंडाळ्याच्या घाटांतील रम्य वनश्रीचा उपभोग अज्ञ मनुष्याइतका त्यानें घेतलेला नसतो. ज्योतिषशास्त्राच्या गणिताचें खरें आरंभस्थान झीटॅपिशिअमच कां धरावें याविषयींचे सर्व आधार गोळा करण्यांत त्याचे दिवस गेल्यामुळें गंगेच्या उगमस्थानाची अप्रतिम शोभा साध्या अज्ञ मनुष्याप्रमाणें उपभोगण्यास त्याला सवड मिळत नाहीं. अशोक राजाचें आपल्या राणीवर प्रेम होतें कीं नाहीं हें सिद्ध करण्यासाठीं जुन्या ताम्रपटांची उलथापालथ तो जन्मभर करील, आणि आपल्या धर्मपत्नीवर व मुलांबाळांवर प्रेम करून त्यांच्या सहवासाचें गोड सौख्य कसें अनुभवावें तें त्याला मरेपर्यंतही कळणार नाहीं. ग्रहांचे व ताऱ्यांचे वेध घेण्यांत

त्याचें उभें आयुष्य खर्च होईल, पण शिकारीसाठीं रानांत जाऊन तळ दिल्यावर रात्रीं तंबूबाहेर उघड्यांत पथारीवर उताणें पडून वरच्या आकाशांतील असंख्य तारकांचें वैभव पहात, आणि भोंवतालच्या झाडींतून उठणाऱ्या रातकिड्यांच्या किरकिरीचें संगीत ऐकत हळुहळू झोंपीं जाण्यांत जें अवर्णनीय सौख्य आहे, त्याचा लाभ त्याला कधींही होणार नाहीं. उदयास्ताच्या वेळीं सूर्यकिरणांचें वक्रीभवन कोणत्या नियमानुसार होतें त्याचा निश्चय करण्यासाठीं तो प्रयोगशाळेंत स्वतःला वर्षानुवर्षं कोंडून घेईल, आणि महाबळेश्वरच्या किंवा माथेरानच्या एखाद्या टोंकावरून दृष्टीस पडणारी सूर्योदयाची किंवा सूर्यास्ताची अनुपम शोभा अज्ञ माणसानें पाहिली असेल तशी त्यानें कधींही पाहिली नसेल. सारांश, खोटें पांडित्य मिरविणाऱ्या पंडिताप्रमाणेंच प्रामाणिकपणानें पांडित्य मिळविणाऱ्या पंडिताचीही स्थिति स्पृहणीय मानण्यास जागा नाहीं. फरक इतकाच कीं, पहिल्याची चीड येते, तर दुसऱ्याची कींव करावीशी वाटते. मग अज्ञानापेक्षां ज्ञान अधिक योग्यतेचें आहे असें कां म्हणावयाचें?

शिवाय, परिपूर्ण ज्ञानाची प्राप्ति करून घेणें सोपेंही नाहीं आणि सुखाचेंही नाहीं. ज्ञानाचा प्रदेश इतका अफाट आहे कीं, तो सर्व पादाक्रान्त करून त्याचें वैभव उपभोगण्याची वेडी महत्त्वाकांक्षा बाळगण्यापेक्षां त्या प्रदेशांतील एखाद्या एकाकी कोपऱ्यांत अज्ञानाची लहानशी पर्णकुटी उभी करून तींत सुखासमाधानानें राहणेंच अधिक बरें ठरेल. सबंध आयुष्यच्या आयुष्य ज्ञानार्जनांत

घालविलें तरी कोणत्या पंडिताला असें म्हणतां येईल कीं, माझ्या ठिकाणीं अज्ञान असें अणुभरही राहिलेलें नाहीं? ज्ञानाच्या प्रदेशाची अखेरची सीमा कल्पनेनें निश्चित करणेंहीं शक्य नाहीं, मग ती प्रत्यक्ष गांठणें तर दूरच राहिलें. राजपुतान्याच्या वाळवंटांतून जाणाऱ्या प्रवाशाला क्षितिज जवळ आहेसा भास होत असतो, पण तो जसजसा पुढें जाईल तसतशी प्रथम जवळ वाटलेली क्षितिज-रेषाही आणखी पुढें सरकली असल्याचें त्याला दिसून येतें. ज्ञानमार्गावरील प्रवाशाची स्थितिही हुबेहुब अशीच अनुकंपनीय असते हें कधींही विसरतां कामा नये. चार चार किंवा सहासहा निरनिराळ्या विषयांत पारंगत असलेल्या विद्वानांचीं उदाहरणें आपल्याला माहीत आहेत; अठरा एकोणीस निरनिराळ्या भाषांचें ज्ञान ज्यांनीं करतलामलकवत् केलें आहे अशा भाषाकोविदांचे दाखले द्यावयाचे झाल्यास सहज देतां येतील; गणित, तत्त्वज्ञान, यंत्रशास्त्र व प्राणिशास्त्र या सर्व शास्त्रांत ज्यांनीं क्रान्तिकारक नवे सिद्धान्त स्थापित केले अशा व्यक्तींचीं नांवें इतिहासांत सांपडणार नाहींत असें मुळींच नाहीं. पण या महात्म्यांविषयीं योग्य तो आदर मनांत कायम ठेवूनही त्यांनीं एकंदर ज्ञानगोलाचा कितीसा प्रदेश काबीज केला हें आपण पाहूं लागलों तर काय दिसेल? त्या महात्म्यांच्याही बुद्धीला अज्ञात असा किती तरी प्रदेश अजून राहिलाच आहे ना? त्यांनाही समजले नाहींत असे किती तरी विषय अजून शिल्लकच आहेत ना?

व्यक्तीच्या मर्यादित ज्ञानाची गोष्ट सोडून दिली आणि

एकंदर मानवी बुद्धीनें आजतागायत केवढें ज्ञान हस्तगत केलें त्याची मोजदाद केली तरी ती तरी कितीशी समाधानकारक होईल ? मानवजातीची प्रत्येक पिढी आपण मागच्या पिढीपेक्षां अधिक ज्ञानवान झालों अशा समाधानांत असते; आणि यंत्र-शास्त्राची हरघडीं चालू असलेली प्रगति, आणि सर्व शास्त्रकला मनुष्याच्या सेवेला जुंपल्या गेल्यामुळें प्रतिक्षणीं वाढत असलेल्या सुखसोयी, यांच्याकडे पाहिलें म्हणजे मानवी बुद्धीनें ज्ञानपराक्रमाची हद्द केली असा क्षणभर भास झाल्यावांचून रहात नाहीं हेंही खरें आहे. परंतु या सुखसोयींनीं उत्पन्न केलेला भ्रम जरा दूर करून क्षणभर शांतपणें विचार केला तर मनुष्यानें अज्ञानाचा पूर्ण मोड करून ज्ञानाची शेवटची सीमा गांठली असें आज—किंवा केव्हांही—म्हणतां येईल काय ? किंबहुना ज्या प्रगतीकडे बोट दाखवून मनुष्यानें अज्ञानांधकार सर्वस्वी घालविला असें म्हणण्याचा आपल्याला मोह होतो, तीच प्रगति मानवी ज्ञान नेहमीं पुढें जाण्याच्या क्रियतच गुंतलेलें असणार, तें पूर्णावस्थेला कधींच पोंचणार नाहीं, तें सदा अपूर्णच असणार, याविषयींची खात्रीलायक साक्ष देते असें म्हणणेंच अधिक सयुक्तिक होणार नाहीं काय ?

व्यक्तीच्या बुद्धीची कुवत, आणि ज्ञानविषयांचा पसारा यांची तुलना केली म्हणजे तर रघुवंशाच्या प्रारंभींच कालिदास कवीनें मानवी बुद्धीला दिलेल्या होडग्याच्या उपमेची यथार्थता तेव्हांच पटते. एकंदर ज्ञानसागर अथांग आहे, इतकेंच नव्हे तर

ज्ञान करून घेण्यासारखा एकेक विषय देखील समुद्रासारखा अफाट आहे यांत यत्किंचित् देखील शंका नाहीं गायन शिकणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला वस्तादजी ‘ नादसमुद्रको हय ’ अशा आरंभाची एक अस्ताई शिकवीत असतात. कोणत्याही चिजेचा अर्थ समजून घ्यावयाची जरूर नाहीं अशी बेफिकिरी गायकाच्या ठिकाणीं नसेल तर नादशास्त्र किंवा संगीतकला ही समुद्रासारखी विस्तीर्ण आहे हें तत्त्व त्याच्या मनांत या चिजेमुळें बिंबेल, व स्वतःच्या संगीतप्राविण्याचा अवास्तव गर्व त्याच्या अंतःकरणाला कधींही शिवणार नाहीं. संगीताविषयीं जें खरें तेंच इतर विषयांच्या बाबतींतही तितकेंच खरें आहे. ज्ञानविषयांची संख्या मोठी असल्यामुळेंच “ Art is long, life is short” असे उद्गार मनुष्याच्या तोंडून निघतात, किंवा ‘ रात्र थोडी, सोंगें फार ’ असा माणसाच्या मनाचा गोंधळ उडून जातो. येवढेंच नव्हे, तर प्रत्येक सोंगांत इतक्या गोष्टी भरलेल्या आहेत कीं, अमक्या एकाद्या विषयाचें ज्ञान मी परिपूर्णतेनें मिळवीन अशी महत्त्वाकांक्षा धरणें देखील मनुष्याच्या आवांक्याबाहेरचें आहे. मग ज्ञानाच्या अनंत आकाशाला गवसणी घालण्याचा दुर्घट प्रयत्न करण्यापेक्षां अज्ञानाची ताबेदारी प्रांजलपणें प्रत्येक मनुष्यानें कबूल करावी हेंच अधिक चांगलें नाहीं काय ? आपण ज्ञानी झालों असें ज्याला वाटतें तो अज्ञ समजावा, आणि ज्याला आपल्या अज्ञानाची अखंड जाणीव आहे त्यालाच ज्ञानी म्हणावें, असा जो चमत्कृतिपूर्ण सिद्धान्त

एका सुप्रसिद्ध तत्त्वज्ञानें केला त्यांतील भावार्थ तरी दुसरा काय आहे ?

बरें, अज्ञानाचा समूळ नाश करणें सोपें नाहीं, तर निदान सुखाचें तरी आहे काय? वेदान्ताचे अभिमानी या ठिकाणीं एकदम उद्गारतील, होय, खात्रीनें आहे. परंतु वेदान्ताच्या दृष्टीनें आपण या विषयाचा विचार चालविलेला नाहीं, किंवा वेदान्ताच्या परिभाषेस अनुसरून आपण या ठिकाणीं 'ज्ञान' व 'अज्ञान' हे शब्द वापरलेले नाहींत. साध्या सरळ व्यवहाराची दृष्टि ठेवून आपण विचार करीत आहोंत, व त्या दृष्टीनें पाहिल्यास अज्ञानाचा नाश सुखदायकच असतो असें आपणांस म्हणतां येईल किंवा नाहीं याविषयीं जबरदस्त शंका आहे. ज्या प्रमाणांत आपलें अज्ञान नष्ट होतें त्या प्रमाणांत आपलें सुख वाढत जातें, असा आपला या संसारांतील अनुभव आहे काय? ज्ञानी तो सुखी, व अज्ञानी तो दुःखी असा आपल्याला प्रत्यय येतो काय? "Knowledge is power" किंवा "विद्येनेंच मनुष्या आलें श्रेष्ठत्व या जगामाजीं" हीं वचनें शाळेच्या भिंतीवर चिकटविण्यास योग्य असतील; पण तसाच विचार केला तर ज्ञान हें सुखाच्या प्राप्तीचें अमोघ साधन आहे असें म्हणतां येईल काय ?

उलट, ज्ञान वाढत जाईल त्या प्रमाणांत माणसाची काळजी, भीति, शंका, असलीं सगळीं दुःखें वाढत जातात हें आपण नेहमीं पहात नाहीं काय? एखादा प्रवासी ऐन मध्यान्हाच्या वेळीं थकून भागून मोठ्या कष्टानें आपल्या मार्गानें चाललेला

असतांना, व तृषेनें व्याकुळ झालेला असतांना, दगडाधोंड्यांतून व हिरवळींतून वाहणारा एक लहानसा पाण्याचा प्रवाह अचानकपणें त्याच्या दृष्टीस पडला असें आपण समजूं. रानावनांत वाहणारें पाणी भलत्यासलत्या विषारी वृक्षांच्या किंवा वेलींच्या स्पर्शानें किंवा सर्पादि प्राण्यांचें गरळ त्यांत पडल्यामुळें प्राणघातक झालेलें असण्याचा संभव असतो, हें त्या प्रवाश्यानें कोठें वाचलेलें असेल तर तो तें पाणी न पितां तृष्णेच्या वेदना सहन करीत पुढें जाईल. आणि उलट तो एक साधासुधा अज्ञ मनुष्य असेल तर त्या पाण्यानें आपली तहान यथास्थित शमवून दुप्पट उत्साहानें तो आपल्या मार्गाला लागेल. इतकेंच नव्हे तर नवमानसशास्त्राच्या सिद्धान्ताप्रमाणें त्या पाण्यांत विषारी गुण दुर्दैवानें असला, तरी त्या प्रवाश्याच्या भोळ्या विश्वासाच्या प्रतिक्रियेनें त्या गुणाचाही कांहींएक परिणाम दिसून येणार नाहीं. वैद्यकीविषयीं व विविध रोगांच्या लक्षणांविषयीं ज्ञान मिळविलेला एखादा विद्वान आपल्या प्रकृतीविषयीं कसा अहर्निश साशंक व चिंतातुर असतो, आणि साध्या, अज्ञ, अडाणी माणसाला कांहीं व्याधि जडली तरी त्याच्या आनंदाचा व उत्साहाचा भंग किती थोडा होतो तें पहावें, आणि मग अज्ञान सुखाचें आहे किंवा नाहीं तें ठरवावें.

सामान्यपणें उपभोग या सदराखालीं जितकीं सुखें, येतात त्या सर्वांविषयीं तर असें खात्रीनें म्हणतां येईल कीं त्या सुखविषयांच्या स्वरूपाविषयीं सम्यक्ज्ञान जितकें कमी

असेल तितकें अधिक चांगलें. रंगभूमीच्या आंत काय चालत, आणि रंगभूमीवरील झगझगीत प्रकाशांत सुंदर दिसणाऱ्या स्त्रीपुरुषांचें वास्तविक स्वरूप कसें असतें, याविषयीं सर्वस्वी अज्ञ असणाऱ्या प्रेक्षकाला नाट्यप्रयोग किती आनंददायक होतो! पण तेंच रंगभूमीच्या अंतरंगांतील खोटेपणा व हिडीसपणा ज्याला माहीत झाला त्याच्या दृष्टीला तो सगळा प्रकार किती आनंदशून्य वाटूं लागतो! ' अतिपरिचयात् अवज्ञा ' हें जसें खरें, तसेंच अतिपरिचयानें सौख्यनाश होतो हेंही खरें. ज्या व्यक्तींच्या संगतीपासून आपणांस सुख होतें त्यांच्याविषयीं थोडेंसें अज्ञानांत राहिल्यानेंच तें सौख्य कायम टिकतें. त्या व्यक्तींची प्रत्येक कृति व प्रत्येक वृत्ति आपणांस माहीत झाली तर सहवाससुखांत कमतरता येण्याचा हजार अंशांनीं संभव असतो. अतिज्ञान कांहीं सुखावह नाहीं. अज्ञानाच्या आसनावर बसल्यानेंच जगांत अधिक आनंद दिसूं लागतो. बाळपणांत जिकडे तिकडे आनंद दिसत असतो याचें तरी कारण ज्ञानाची विकृति दृष्टीला जडलेली नसते हेंच नव्हे काय? अज्ञानाच्या मुग्धपणामुळेंच बालकांना अक्षय सुखाचा अनुभव घेतां येतो असें म्हणावयास कोणती हरकत आहे? आणि ॲडम व ईव्ह या मूळ स्त्रीपुरुषांनीं ज्ञानफल चाखल्यामुळेंच सबंध मानवजातीचा अधःपात झाला, या ख्रिस्ती कथेंत तरी अज्ञानाच्या महतीखेरीज दुसरा कोणता भावार्थ आहे?

—मे, १९२६



# ६ संसार

संसार मिथ्या आहे असें सांगणारे लोक पुष्कळ आहेत; पण तसें समजणारीं माणसें कितीशीं सपांडतील? अंतःकरणाला पटलेल्या गोष्टी जिभेनें सांगण्याची कला ज्या काळीं मनुष्याल अवगत नव्हती त्या काळांत संसार मिथ्या आहे असें सांगणा ऋषि विरळा असत. पण आतां तो काळ उरला नसल्याने शंकराचार्यांपासून तों शंकर आचाऱ्यापर्यंत वाटेल त्यानें संसा मिथ्या आहे असा उद्गार काढावा अशी स्थिति झाली आहे "ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या।" या सिद्धान्ताचें निरूपण कराव यास आतां श्रीशंकराचार्यांच्या अंगचें वैराग्य किंवा ज्ञान कांहींच लागत नाहीं. देवळांतले कीर्तनकार, व्यासपीठावरचे प्रवचनकार आणि तत्त्वज्ञानावर लिहिणारे ग्रंथकार यांचा मुळीं जन्मसिद्ध हक्कच होऊन बसला आहे कीं, संसार मिथ्या आहे असा कंठरव करावा. तो कंठरव हेंच त्यांच्या धंद्यांतील नगदी भांडवल होऊन बसलें आहे. विजेच्या भर रोषनाईंत व

अत्तरगुलाबांच्या दरवळणाऱ्या घमघमाटांत वीतभर उंचीच्या गालिच्यावर उभें राहून नाना वस्त्रभूषणांचे अलंकार ल्यालेल्या स्त्रीपुरुषांपुढें संसाराच्या मिथ्यत्वावर व्याख्यान करणाऱ्या कीर्तनकाराचें चित्र हास्यरसाच्या दृष्टीनें चांगलेंच सरस ठरेल. संसाराच्या विविध सुखांत दंग राहून दोन घटका संसाराच्या मिथ्यत्वाचें व्याख्यान ऐकण्याची लालसा स्त्रीपुरुषांना वाटावी हें प्रथमदर्शनीं मोठें आश्चर्यकारक वाटतें. पण, वास्तविक मानवी स्वभावाच्या वैचित्र्याचा हा एक फक्त मासला आहे. गत दुःखानुभवांच्या आठवणी काढण्यांत मनुष्याला समाधान वाटतें, किंवा शोकरसानें ओथंबलेले नाटकी करुणप्रसंग पाहून अश्रु ढाळण्याचा आनंद मनुष्याला पुनःपुन्हा उपभोगावासा वाटतो, त्यांतीलच हा प्रकार. संसाराच्या मिथ्यापणाच्या कीर्तनाचें महत्त्व कीर्तनकार व श्रोते या दोघांच्याही दृष्टीनें एखाद्या गाण्याच्या मैफलीपेक्षां क्वचितच अधिक असतें. असल्या कीर्तनरंगानें वैराग्य उत्पन्न होण्यासारखें असतें तर घरोघरच्या चुलींतील धूर केव्हांच दिसेनासा होऊन, बैराग्यांच्या धुमींतील धुरानेंच दशदिशा नेहमीं व्याप्त राहिल्या असत्या. पण तसें होत नाहीं, आणि कधीं व्हावयाचेंही नाहीं. कारण संसार हा केवळ भ्रम आहे असें सांगणाराही आपला संसार सांवरण्यासाठींच त सांगत असतो, आणि तें ऐकणाराही संसारांतील एक करमणूक या दृष्टीनेंच तें ऐकत असतो. संसार केवळ माया आहे असें बोलणारे व ऐकणारे, दोघेही संसारावर माया करण्यांत सारखेच मग्न असतात.

आणि यांत आश्चर्य तें काय? संसाराची निस्सारता लोकांना सहसा पटत नाहीं याचें खरें कारण उघड आहे. दुःख भोगण्याची पाळी येईल त्या वेळीं त्या दुःखाचा चटका कमी व्हावा म्हणून मनावर वेदान्ताची फुंकर लोक घालतात. पण या पलीकडे वेदान्ताची आठवण लोक कितीशी ठेवतात? एकुलत्या एका पुत्राच्या मृत्यूनें शोकाकुल झालेल्या बापाचें सांत्वन करावयाचें झाल्यास त्याचे आप्तेष्ट संसाराच्या मिथ्या स्वरूपाची, आणि संसाराचीं सुखदुःखें हीं केवळ आभास असल्याची त्यास आठवण करून देतात, आणि त्या दुःखग्रस्त पित्याच्या हृदयाचा दाहही या विचारसिंचनानें बराचसा कमी होतो. परंतु त्याच गृहस्थास पुढें ईशकृपेनें पुत्रप्राप्ती झाली, तर त्यानिमित्त होणाऱ्या आनंदोत्सवाला जमलेले तेच आप्तेष्ट त्या वेळीं संसारसुखाच्या भासस्वरूपाची त्यास आठवण करून देतील काय? मृत पत्नीच्या शोकाची जाचणी बंद करूं इच्छिणारा विधुर ' संसार असार आहे ' या विचाराच्या सुईनें तें शल्य काढतो. पण त्याच विधुराचा पुढें द्वितीय विवाह झाला, आणि नव्या संसारसुखांत त्याचें मन रमलें म्हणजे आपल्या मनांत वेदान्तविचाराला सुईच्या अग्राएवढादेखील अवकाश द्यावयास तो तयार नसतो. सारांश, सुखाच्या वसंतऋतूंत माणसाला वेदान्ताची आठवण होत नाहीं; दुःखाच्या शिशिरऋतूंत तेवढे वेदान्तविचाराचे गरम कपडे अंगावर चढवावेसे त्याला वाटतात. ससारांतील सुखांचा मनसोक्त उपभोग घ्यावयास माणूस उत्सुक असतो, आणि दुःखाचा ताप

कमी करण्याचें साधन म्हणूनच केवळ तो वेदान्त वापरतो. अर्थात् सूर्यतापनिवारणार्थ वापरावयाची छत्री जशी चांदण्या रात्रीं घरांतील कोपऱ्यांत पडून रहाते, तसाच " संसार निस्सार " हा वेदान्तही बहुतेक कोपऱ्यांत पडलेला असतो !

या सर्व प्रकाराचें मूळ कारण हें आहे कीं, सुख तेवढें पाहिजे आणि दुःख तेवढें नको अशी माणसाची स्वभावतः इच्छा असते. वेदान्तांत मायावाद शिरावयासही ही इच्छाच कारण होते. परमेश्वरानें हें जगत् निर्माण केलें असें गृहीत धरल्यावर जगतांत दुःख कां असावें या प्रश्नाचा उलगडा करण्याची जरूरी भासूं लागते. परमेश्वर जर सर्वशक्तिमान आहे तर या संसारांतील दुःख नाहींसें करण्याचें सामर्थ्य त्याच्या हातीं असलेंच पाहिजे. तसें सामर्थ्य असूनही परमेश्वर या जगतावर दुःख नांदूं देत आहे त्या अर्थीं प्राण्यांनीं दुःख भोगावें अशीच त्याची इच्छा असली पाहिजे. पण तसें म्हणणें म्हणजे परमेश्वराच्या परम-दयालुत्वांत वैगुण्य असल्याचें कबूल करण्यासारखें आहे. बरें, तें वैगुण्य कबूल न करितां परमेश्वर परमदयाळु आहे असा आग्रह धरला, तर मग जगांतील दुःखनिवारण करण्याची इच्छा असून त्यास तसें करतां येत नाहीं असें म्हणणें भाग पडेल. एवंच जगांतील दुःख नाहींसें करण्याची परमेश्वरास एक इच्छा तरी नाहीं किंवा शक्ति तरी नाहीं. किंवा हेंच निराळ्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास परमेश्वर दुष्ट तरी आहे किंवा दुबळा तरी आहे.

जगांतील सुखदुःखांचें सत्यत्व एकदां कबूल केलें, कीं मनुष्य या पेचांत सांपडतो, व त्याच्या तत्त्वज्ञानाची मोठी कठिण अवस्था होऊन जाते. खोड्यांत सांपडलेल्या माणसानें कोणतीही चळवळ केली तरी ती जशी त्याला क्लेशकारक होते त्याप्रमाणें परमेश्वराचें दुष्टत्व किंवा दुर्बलत्व, कांहींही कबूल केलें तरी त्यापासून माणसाच्या मनाला क्लेशच होतात, आणि एक कांहीं तरी मान्य केल्यावांचून तर त्यास गत्यंतर उरत नाहीं.

या पेंचांतून सुटण्याचा उत्तम मार्ग म्हणजे संसारांतील सुख-दुःखांची सत्यताच अमान्य करणें हा होय, असें वेदान्तप्रवर्तकांस दिसून आलें, व त्याप्रमाणें त्यांनीं सिद्धान्त केला. आपणांस जीं सुखदुःखें वाटतात तीं सत्यस्वरूप नसून केवळ आभास-मय आहेत असें प्रथमच म्हटलें म्हणजे परमेश्वरानें जगांत दुःख कां राहूं दिलें हा प्रश्नच उरत नाहीं. जें नाहींच त्याच्या अस्तित्वाचा खुलासा कसला करावयाचा ? जें केवळ भास आहे त्या-बद्दलची जबाबदारी परमेश्वरावर कोठून येणार? संसार व संसा-रांतील सुखदुःखें मिथ्या आणि मायाधिष्ठित आहेत, असा मूल सिद्धान्त कल्पून त्यावर वेदान्ताची उभारणी केली कीं, परमेश्व-राच्या परमकर्तृत्वाला किंवा दयालुत्वाला बाध येण्याचा संभव रहात नाहीं, प्राण्यानें परमेश्वरावर सर्वस्वी भार टाकावा असें म्हणतां येतें, आणि नीतीचें व धर्माचें प्रतिपादन सुसंगत रीतीनें शेवटपर्यंत करतां येतें.

परंतु या युक्तीनें सर्व प्रश्नांचा नीट उलगडा होतो असें

समजतां यावयाचें नाहीं. परमेश्वराच्या दयालुत्वांत किंवा सामर्थ्यांत न्यून मान्य करण्याची अडचण या विचारसरणीनें दूर होते हें खरें. पण ही एक अडचण टळते तर दुसऱ्या अडचणी उद्भवतात; आणि त्या कांहीं कमी महत्त्वाच्या नाहींत. अडचणींचें गांठोडें बांधून तें आपण दारावाटे बाहेर फेंकून दार बंद करावें, पण दुसऱ्या कोणी तें खिडकीवाटे पुन्हा आंत टाकावें, तशी स्थिति होते. संसारांतील सुखदुःखें आभास आहेत असें म्हटलें तरी तो आभास कोण उत्पन्न करतो हा प्रश्न उभा राहतोच परमेश्वराखेरीज दुसऱ्या कोणाच्या कर्तृत्वानें तो उत्पन्न होतो असें म्हटलें तर परमेश्वर एकटाच सर्वकर्ता आहे या सिद्धान्ताला बाध येतो. परमेश्वरच तो आभास उत्पन्न करतो असें म्हटलें तरी तें सोयीचें नाहीं. कारण दुःखाचा आभास असला तरी तो क्लेशकारकच आहे, व प्राण्यांना येवढे क्लेश तरी परमेश्वरानें कां द्यावे असें विचारतां येईलच. लहान मुलाला आपण बुवा दाखवून भीति दाखवितों त्या वेळीं ती भीति खरी नसून आभासजन्यच असते. पण ती तशी असली तरी त्या मुलाला क्लेशदायक असतेच. तद्वत् संसारांत दुःखाचा आभास असला तरी तो दुःखाचा असतो, व त्यामुळें आभासमय दुःखाच्या वेदना तरी परमेश्वरानें या जगतांत कां राहूं द्याव्या, इतका तरी निष्ठुरपणा त्याच्या अंगीं कां असावा, हा प्रश्न शिल्लक राहतोच. मनांत खावयाचेच असले तर ते चणे खाण्यापेक्षां मांडे तरी खावे असें आपण सामान्य

व्यवहारांतही म्हणतों. त्या न्यायानें परमेश्वर आभास उत्पन्न करतो खरा, मग तो सदा सुखाचाच आभास कां उत्पन्न करीत नाहीं अशी शंका साहजिकपणेंच उत्पन्न होते. तसेंच मात्रास्पर्शगम्य सुख-दुःखांचा वास्तविक पाहतां आत्म्यावर कोणत्याही प्रकारें परिणाम होत नसून केवळ जीव अज्ञानाच्या मोहांत गुरफटल्यामुळें त्यास तीं सुखदुःखें आपण अनुभवीत आहोंत असा भास होतो, अशी कोटी लढविली तरी तीहि फार वेळ टिकत नाहीं. कारण जीवात्म्यास हा मोह तरी कां पडावा, व जो जीवात्मा वास्तविक सच्चिदानंदस्वरूप आहे त्यास अज्ञानाची बाधा अल्प काळ तरी कां व्हावी, हे प्रश्न ताबडतोब उपस्थित होतातच, आणि त्यांचीं समाधानकारक उत्तरें देणेंही अशक्यप्रायच होऊन बसतें.

पण या अडचणींच्या चक्रव्यूहांत वेदान्ताला फेऱ्या माराव्या लागतात याचें मूळ कारण, वर सुचविल्याप्रमाणें, संसारांतील सुखांचा उपभोग घ्यावयास माणूस तयार आहे, पण दुःखाचा अनुभव मात्र त्यास आपत्तिसमान वाटतो, व ती आपत्ति कोणत्या तरी उपायानें किंवा विवेकानें टाळण्याची त्याची इच्छा असते, हें होय. ही इच्छाच बदलली तर मायावादाची गरज उरणार नाहीं. संसारांतील सुखाचा तेवढा आस्वाद घ्यावयाचा, आणि दुःखराशि पुढें आल्यावर मात्र त्या दुःखाचा विसर पडण्यासाठीं कसल्या तरी कल्पनांची निशा मनावर मुद्दाम चढवून घ्यावयाची ही वृत्तीच माणसानें टाकली पाहिजे. संसारांतील सुखें व दुःखें दोन्हीही सत्य आहेत असें म्हणावयास काय हरकत आहे ?

संसार सत्य समजून त्यांतील सुखदुःखांस सारख्याच तयारीनें आणि खुषीनें तोंड दिलें तर तें काय वाईट ? पायाचें रक्षण करून सौख्य देणारा जोडा पायाला थोडासा लागूं लागला तर तो त्रास होऊं नये म्हणून जोडाच मिथ्या आहे असें मानूं लागण्यांत काय स्वारस्य आहे ?

आणि संसार सत्य मानून त्यांतील सुखदुःखें सारख्याच तयारीनें पतकरण्याची वृत्ति आपण ठेवली तर संसाराविषयीं अगदींच कष्टी व निराश होण्याचें कारण पडेल असें नाहीं. संसारांत प्रत्येकाच्या वांट्याला दुःख थोडेंबहुत येणारच. दुःखाचें अस्तित्व नाकबूल करणें शक्य नाहीं. कांट्याकुट्यांचें रान अनवाणी तुडविणाऱ्या लांकुडतोड्याप्रमाणेंच पराच्या गादीवर शयन करणाऱ्या राजालाही कोणतें तरी दुःख खुपत असतेंच. पण संसारांतील सुखदुःखांचा आढावाच काढूं लागल्यास दुःखांच्या वाळवंटापेक्षां सुखाचे बागबगीचेच येथें अधिक आहेत अशी हळुहळू खात्री होईल. संसारांतील प्रत्येक घडामोडींत नारिकेल फलांतल्याप्रमाणें सुखाचें जें मधुर जल असतें तें मिळविण्याची मार्मिक दृष्टि मात्र अंगीं पाहिजे. ती असेल तर संसार असार आहे अशा न पटणाऱ्या वेदान्ताची चर्पटपंजरी करीत बसण्याची पाळी येणार नाहीं; आणि दुःखाचा भार एकीकडे सहन करूनही संसारांतील सुखाच्या प्राबल्याकडे दृष्टि ठेवून चित्ताची आनंदवृत्ति अढळ ठेवतां येईल.

—जुलाय, १९२६

७

# एकांतवास

मनुष्य हा सहवासप्रिय प्राणि आहे यांत संशय नसला तरी त्याच्या इतर स्वभावधर्मांप्रमाणें या सहवासप्रियतेसही सीमा आहे हें विसरतां कामा नये. प्रत्येकाच्या अनुभवांतील ही गोष्ट आहे, कीं कित्येक वेळां मनुष्यास कोणाचाही सहवास नकोसा होतो. दुःखनिवेदनानें दुःखाची तीव्रता कमी होते हें तत्त्व खरें असलें तरी दुःख भोगणाऱ्या मनुष्याला त्या तत्त्वाप्रमाणें वागावेंसें क्वचितच वाटतें. दुःखाच्या भाराखालीं अंतःकरण दडपलें गेलें, कीं तें मोकळेपणीं उघड करणें जणुं कांहीं कठीणच होऊन बसतें, आणि मनुष्य चारचौघांत मिसळण्याऐवजीं एकांतांत अश्रु ढाळण्यासच अधिक तयार असतो. मध्यम पांडवाऐवजीं कौरवश्रेष्ठाशीं आपला विवाह होणार हें पाहतांच निराशेनें व्याकुळ झालेली सुभद्रा जगाच्या संपर्काला कंटाळून आपल्या मनाशीं झुरण्याचीच इच्छा करते, असें दाखविणाऱ्या नाटककारानें मनुष्यस्वभावाचें निरीक्षण मार्मिकपणें केलें असलें पाहिजे यांत संशय

नाहीं. आणि दुःखाच्या वेळींच मनुष्याची अशी अवस्था होते असें नाहीं. आनंदाची परमावधि झाली म्हणजेही अनेक वेळां हाच परिणाम दिसून येतो. एका अत्यंत महत्त्वाच्या लढाईंत आपल्या कल्पनेबरहुकूम रशियन सैन्याचा धुव्वा उडविल्या-बरोबर त्या अत्यानंदाच्या भरांत जोसेफाइन राणीला पत्र लिहितांना " मला इतका अमर्याद आनंद झाला आहे कीं, या वेळीं जवळ कोणीही नको असें मला वाटत आहे. बस ! मी आणि माझा आनंद यांखेरीज जगांत या क्षणीं कांहींही असतां कामा नये ! " असे उद्गार काढणाऱ्या नेपोलियनचें उदाहरण लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

सुखाचा किंवा दुःखाचा अतिरेक झाला म्हणजेच मनुष्याचें मन सहवासाला विटतें अशी कोणी कल्पना केली तर तीही खोटी ठरेल. कोणत्याच प्रकारच्या विकाराचा विशेष उद्रेक अंतःकरणांत झालेला नसतांही पुष्कळदां आपल्याला माणसाचा वारा नकोसा होतो. अजस्र लोकसंख्येच्या मुंबईसारख्या प्रचंड शहरांत राहणाऱ्या लोकांना या वृत्तीचा अनुभव असेल. चार दिव-सांच्या चैनीसाठीं मुंबईस येणाऱ्या पाहुण्याला लोकांची दाटी, रस्त्यांतील गजबजाट, आणि दिव्याचा लखलखाट, या सर्व गोष्टी स्पृहणीय वाटतात. परंतु अहोरात्र त्या गजबजाटांत जीवित कंठ-णाऱ्या माणसाला कधीं कधीं तो जिवंत जाच असह्य होतो. रात्रंदिवस मुंग्यांच्या वारुळाप्रमाणें दिसणारे मुंबईचे बाजाररस्ते एखाद्या सुटीच्या दिवशीं उजाड दिसले तर ती शांतता

वास्तविक भीषण असूनही एक प्रकारें आल्हाददायक वाटल्यावांचून राहत नाहीं. झगझगीत विद्युत्प्रकाशांनीं राजमार्गांचें वैभव कितीही वाढत असलें, तरी चंद्रप्रकाशाच्या रमणीय काव्याची कायमची खराबी करणाऱ्या त्या दिव्यांचा कधीं कधीं संताप येतो, आणि कवींचें राज्य असतें तर चंद्रिकेचा घात करणाऱ्या या प्रकाशाचें हें कृष्णकृत्य तावडतोब बंद केलें असतें, असा विचार सुचल्यावांचून रहात नाहीं. आणि इतर वेळीं मनाला आनंद देणाऱ्या सुधारणेच्या सुखसोयी कधीं कधीं इतक्या नकोशा वाटतात कीं, मुंबईच्या इतक्या अफाट विस्तारांत, निःशब्द शांततेची वावभरही जागा नसावी याबद्दल मन खिन्न झाल्यावांचून रहात नाहीं. सारांश, जनसंमर्दाविषयींचा तिटकारा हा एक सामान्य अनुभव आहे. प्रत्येक व्यक्तीला हा अनुभव केव्हां ना केव्हां तरी आलेला असतो. मानवी सहवासाची आसक्ति पार लुप्त झाल्याचे क्षण प्रत्येकाच्या आयुष्यांत येऊन जातात. एकांतवासाची इच्छा मनुष्याला वारंवार होत असते. सहवाससुखावर मनुष्य कितीही लुब्ध झालेला दिसला तरी एकांतवासाची आवड त्याच्या हृदयांत पुनःपुन्हा डोकें वर काढीत असते. ती आवड सर्वस्वी नष्ट होणें शक्य नाहीं.

तसेंच पाहिलें तर जन्मापासून अखेरच्या क्षणापर्यंत प्रत्येक मनुष्य एक प्रकारच्या एकांतवासांतच सर्व काळ कंठित असतो. जन्मदात्री माता व सुईण यांची तरी निदानीला सोबत घेऊन प्रसूतिगृहांतील शय्येवर पहिलें पाऊल टाकण्यापासून, तों

आप्तेष्टांच्या घोळक्यांत मृत्युशय्येवर शेवटचा निश्वास टाकण्यापर्यंत, प्रत्येक मनुष्याचें आयुष्य पाहिलें तर कोणाच्या ना कोणाच्या तरी सहवासांतच जातें, या दृष्टीनें पाहतां एकांतवास ही मनुष्याला अत्यंत दुर्मिळ असणाऱ्या वस्तूंपैकीं एक होय असें म्हणण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. परंतु वास्तविक स्थिति तशी नाहीं. सूक्ष्म दृष्टीनें विचार केला तर मनुष्याला एकांत दुर्लभ नसून उलट मनुष्यानें कितीही प्रयत्न केला तरी त्याची एकांत स्थिति सुटणें शक्य नाहीं असें दिसून येईल. हें विधान दिसावयास अंमळ चमत्कारिक दिसतें, पण वाचकांनीं थोडा विचार केल्यास त्यांना तें पटल्यावांचून राहणार नाहीं.

एखाद्या असामान्य लोकनायकाला लोक मानपत्र समर्पण करीत असले तर त्या प्रसंगीं त्या लोकनायकाच्या मनाची स्थिति कशा प्रकारची असते? त्या वेळीं तो मनुष्य हजारों लोकांच्या संमर्दांत सामील झालेला असतो. इतकेंच नव्हे तर त्या सर्व लोकांच्या अवधानाचा तो विषय झालेला असतो. आणि त्यांना उद्देशून भाषण करावयास तो उठला म्हणजे त्याचें चित्तही त्यांच्या ठिकाणीं लागलेलें असतें. त्या घटकेस तो वक्ता त्या हजारों श्रोत्यांच्या सहवासांत आत्यंतिकपणें असतो असेंच कोणीही म्हणेल. आणि मनुष्याच्या एकांत मनःस्थितीच्या नाशाचें उत्तम उदाहरण म्हणून त्या घटनेकडे बोट दाखवावेंसेंच कोणासही वाटल. परंतु खरें पाहतां त्या घटकेला तरी त्या मनुष्याच्या मनाच्या एकांताचें सूत्र तुटलेलें असतें काय? आपल्या मनांत

त्या क्षणीं उद्भवणारे एकूण एक विचार, विकार, भावना, आशा, निराशा, आणि महत्त्वाकांक्षा, त्या श्रोतृवृंदापुढें उघड करून दाखविण्याचा त्याचा हेतु असतो काय ? उघड बोलून न दाखविण्यासारखे असे किती तरी विचार त्याच्या मनांत त्या क्षणीं चालू नसतात काय ? लोकांना स्पष्ट न सांगण्यासारखे किती तरी कल्पनातरंग त्या क्षणीं त्याच्या मनांत उठत नसतात काय? मनांतल्या मनांतच ठेवण्यासारख्या किती तरी भावनांचा अनुभव त्याला त्या क्षणीं येत नसतो काय ? आणि आपलें हृदय सर्वस्वीं खुलें करून बोलण्याचा त्याचा हेतु असला तरी तो साध्य होणें शक्य नाहीं हें त्याला माहीतही नसतें काय ? "माझ्या मनांत या वेळीं जे विचार येत आहेत ते सर्व मला बोलून दाखवितां येत नाहींत" अशाच कांहींशा शब्दांनीं तो आपल्या भाषणाची प्रस्तावना करीत नाहीं काय ?

त्या वक्त्याची त्या वेळची जी मनःस्थिति तीच प्रत्येक व्यक्तीच्या मनाची प्रत्येक क्षणींची स्थिति असते. सहवासांत असूनही आपल्यांपैकीं प्रत्येकजण वास्तविक एक प्रकारच्या दुर्भेद्य एकांतवासांतच असतो. प्रेक्षकांच्या टाळ्यांच्या कडकडाटांत रंगभूमीवर प्रवेश करून गाणारा नट असो, किंवा तोफांच्या गडगडाटांत पुढें सरसावून ऐन गर्दीचें युद्ध सुरू झाल्यावर हजारों सैनिकांच्या बरोबर रणगर्जना ठोकून शत्रुपक्षाच्या शिपायांवर घाव घालणारा वीर असो, दोघांचींही मनें निर्जन अरण्यांत ध्यानस्थ बसणाऱ्या मुमुक्षूच्या मनाइतकींच एकांतांत

एक प्रकारें असतात. प्रत्येक मनुष्याच्या मनाचा एकांतिक व खाजगी व्यापार अव्याहत चालू असतो. या एकांतिक व्यापारामुळें येणारा अनुभव दुसऱ्याला सांगावयाचा म्हटला तरी तो सांगतां येणें अशक्य–मानवी सामर्थ्याच्या पलीकडे असतें. प्रत्येक व्यक्तीच्या जन्ममरणाप्रमाणेंच क्षणोक्षणींचे विविध अनुभवही खरें पाहतां अत्यंत एकांतिक असतात. ते ज्याचे त्यानेंच अनुभवावे, व ज्याचे त्याच्याबरोबरच लयही पावावेत असें त्यांचें स्वरूप असतें. त्यांना एकांताचा जो रंग निसर्गतः चढलेला असतो तो कितीही प्रयत्न केला तरी पुसतां येण्यासारखा नसतो. ते अनिर्वचनीय असतात.

एकाच भव्य ताजमहालाकडे एका वेळीं पाहणाऱ्या दोन व्यक्तींच्या मनोव्यापारांचें पृथक्करण केल्यास काय दिसून येईल? दोघानांही आनंद वाटला तरी त्या आनंदाचें विशिष्ट स्वरूप प्रत्येकाच्या बाबतींत भिन्नच असणार. एकाच सुंदर पुष्पाच्या दर्शनानें भिन्न भिन्न व्यक्तींच्या मनांत उत्पन्न होणारा विकार आल्हाद या एकाच सामान्य नामानें संबोधला जातो तो केवळ भाषेच्या व व्यवहाराच्या सोयीसाठीं; खरें पाहतां त्या आल्हादाचें प्रमाणच नव्हे तर स्वरूपदेखील त्या त्या व्यक्तीच्या पूर्वानुभवाप्रमाणें वेगळेंच असतें. मधुर कंठांतून निघणाऱ्या स्वरमालिका एकाच वेळीं शेंकडों श्रोत्यांच्या कानीं पडल्या कीं सर्वांचींच मनें प्रसन्न व तल्लीन होतात हें खरें असलें, तरी त्यांमुळें ज्या अनेक आठवणी, विकारलहरी आणि पूर्वसंस्कारांच्या व

आशानिराशांच्या मालिका जागृत होतात त्या प्रत्येक श्रोत्याच्या बाबतींत निरनिराळ्याच असतात. याच दृष्टीनें एका मार्मिक टीकाकारानें असें म्हटलें आहे, कीं नाटकाचा बरेवाईटपणा नाटककारानें तें कसें लिहिलें आहे त्यावर अवलंबून असण्यापेक्षां, तो तो प्रेक्षक त्या त्या वेळीं कोणत्या वृत्तीच्या भूमिकेवर बसून तें पाहतो त्यावरच अधिक अवलंबून असतो. सासरीं जाणाऱ्या शकुंतलेला निरोप देतांना गहिंवरून गेलेल्या कण्वमुनींचे उद्गार ऐकून त्या अनुभवांतून गेलेला वयस्क मनुष्य उपरण्यानें डोळे पुसूं लागतो, आणि तारुण्याच्या उंबऱ्याजवळ कोठें नुकताच येऊन ठेपलेला तरुण मात्र निर्विकार राहतो यांतील मर्मदेखील हेंच नाहीं काय ?

व्यक्तिव्यक्तींचे अनुभव स्वतंत्र, असदृश, एकांतिक असेच असतात. प्रत्येक व्यक्तीच्या मनाचें वास्तव्य एक प्रकारच्या एकांतांत असतें, आणि तो एकांत बाह्याकारीं कितीही सुटलेला दिसला तरी वस्तुतः कधींच सुटत नसतो. प्रत्येकाच्या अनुभवाला एक गुप्त पदर असतो, आणि तो अत्यंत जिव्हाळ्याच्या मनुष्याजवळ उलगडावयाचा म्हटला तरी उलगडणें अशक्यप्राय असतें. कपटी मुत्सद्द्यांच्या अंतःकरणांचा ठाव कोणालाही लागत नाहीं यांत आश्चर्य नाहीं; कारण मारवाडांतील विहिरींप्रमाणें तीं खोल असतात, आणि माणुसकीचा ओलावा त्यांच्या अगदीं तळाशीं फार तर टिपूसभर सांपडण्यासारखा असतो. परंतु अभिन्नहृदय झालेल्या पतिपत्नींचीं अंतःकरणें तरी एकमेकांस सर्वस्वीं कळणें

कोठं शक्य असतं ? गाढालिंगनानें हृदयाला हृदय मिळालेल्या क्षणींदेखील प्रियकराच्या मनाचे एकांतिक असे जे व्यापार चालतात त्यांचें ज्ञान प्रियकरिणीस होणें शक्य आहे काय ? ज्या प्रियसहवासास मनुष्य ‘ एकान्त ’ ही संज्ञा देतो त्या वेळीं देखील जर प्रत्येक व्यक्तीचें मन सर्वस्वीं उघड न होतां एकप्रकारच्या एकांतवासांत असतें तर इतर वेळीं तें तसें असल्यास नवल काय ?

आणि माणसाचा एकांतवास असा अबाधित राहतो याचें कारण कदाचित् हेंही असेल कीं, माणसाचें मूलस्वरूप तत्त्वतः एकांतिक आहे. मनुष्य या जगांत येतो तो एकटा, आणि येथून जातो तोही एकटा अशी जी एक लोकप्रिय वेदान्ती म्हण आहे तिच्यांत हाच अर्थ गर्भित आहे; आणि माणसाच्या येण्याजाण्याप्रमाणेंच त्याचें येथील राहणेंही खरें पाहतां एकांतींच असतें ही सहसा लक्षांत न येणारी गोष्टही या म्हणींत अंतर्भूत केली म्हणजे ती अर्थाच्या दृष्टीनें पूर्ण होईल. आत्म्याचें अंतिम स्वरूप कसेंही असो, वेदान्ताच्या अवघड परिभाषेच्या सीमेच्या अलीकडे राहून इतकें म्हणावयास हरकत नाहीं, कीं आत्मा शरीरस्थ होऊन वैयक्तिक जीवितयात्रेला प्रारंभ झाला, कीं त्या त्या जीवाची उन्नति काय किंवा अवनति काय त्याच्या एकांत अनुभवाच्या वळणावरच अवलंबून असते. ब्रह्मज्ञान कोणी कोणाला सांगून होत नसतें, तें सर्वस्वीं त्या त्या जिवाच्या एकांत अनुभवानें सिद्ध होतें, या संतांच्या व ऋषींच्या मतांतील मर्महीं हेंच आहे.

म्हणूनच वेदांती दृष्टीनें पाहिलें काय, किंवा व्यवहाराच्या दृष्टीनें पाहिलें काय, प्रत्येक मनुष्यानें एकांतवासाचा अभ्यास ठेवला पाहिजे. त्यांत त्याचेंही हित व समाजाचेंही तितकेंच हित आहे. व्यवहाराच्या दृष्टीनें एकांत वृत्तीपासून होणारे फायदे उघड आहेत. काव्य, ललितवाङ्मय, चित्रकला या सर्वांची जननी मनुष्याची एकांत वृत्ति आहे. मानवजातीचें वैभव वाढविणाऱ्या सर्व कविकृति आणि चित्रकृति त्या त्या व्यक्तीच्या मनाच्या एकाग्र व एकांत विलासाचीं फलें आहेत यांत किमपि संशय नाहीं. आणि मनुष्यानें स्वतःच्या उन्नतीच्या धोरणानें पाहिलें तरीही आपापल्या मनाची शुद्ध एकांत स्थिति सारखी कायम राखण्यानेंच ती साध्य होण्यासारखी असते. जगांत संकटें आणि सन्मान सारखींच इतस्ततः पसरलेलीं आहेत. संसारांत सुखदुःखांच्या रांगांमधूनच सर्वांच्या आयुष्याची वाट गेलेली आहे. त्या वाटेनें जात असतांना मनुष्यानें आपल्या मनाच्या एकांतवासाचें अवधान सारखें कायम ठेवलें म्हणजे ती वाट त्याच्या उन्नतीची ठरते. (पर्जन्यकाळीं वरून कितीही जलधारा पडल्या तरी त्या तात्पुरत्या अंगावर घेऊन पुन्हा अलिप्त राहणाऱ्या कमलपत्राप्रमाणें माणसानें संसारांत राहूनही आपल्या मनाचा एकांतवास अव्याहत ठेवावा यांतच शुद्ध आनंदाचें रहस्य आहे!)

—ऑगस्ट, १९२६




# विरह

विरहाची कल्पना सापेक्ष आहे. प्रेमाची कल्पना आल्याखेरीज विरहाची खरी कल्पना होणें शक्य नाहीं. मात्रास्पर्शांच्या बाबतींत असा नियम आहे, कीं शीतलतेचा अनुभव आल्याखेरीज मनुष्याला ऊष्णतेचा अनुभव येत नाहीं. परंतु विरहाच्या बाबतींत असा विचित्र न्याय आहे कीं, आधीं प्रेमाच्या प्रखरतेनें हृदय विव्हल झालेलें असेल तरच त्या हृदयाला विरहाचा खरा चटका बसणें शक्य आहे. प्रेमानुभवावांचून थंडगार राहिलेलें अंतःकरण विरहानें व्याकुळ होईल असा संभवच नाहीं. त्यामुळें विरहाचीं काव्यें सगळेंच कवि लिहितात, आणि विरहाचीं चित्रें सगळेच चितारी रंगवितात, हें जरी खरें असलें, तरी त्यांत अनुभवाचा अस्सल रस किंवा रंग उतरलेला दिसणें फार कठिण आहे. कारण, विरहव्यथेचा अनुभव प्रेमव्यथेच्या अनुभवावांचून कोठून येणार ? आणि प्रेमव्यथा हा सर्वांच्या वांट्याला येणारा अनुभव थोडाच आहे ? प्रेमाच्या व्याख्या आणि सुरस

कथा काव्यांतून व नाटककादंबऱ्यांतून सर्वांच्या वाचनांत येत असल्या तरी प्रेम ही वस्तु काय आहे तें कळणें त्या सर्वांच्या भाग्यांत थोडेंच लिहिलेलें असतें ? स्टीव्हनसन या इंग्रज ग्रंथकारानें विनोदानें एके ठिकाणीं म्हटलें आहे, कीं " एखाद्या तरुणीजवळ विवाहासाठीं संमति मागतांना प्रत्येक तरुण प्रणयाची भाषा बोलतो खरा; परंतु त्या भाषणाचा प्रवाह त्याच्या मुखांतून चालला असतांना त्याच्या हृदयांत खऱ्याखुऱ्या प्रेमाचा अंश ऐन हिंवाळ्यांत लंडन शहरांत मिळणाऱ्या सूर्यप्रकाशाहूनही कमी असण्याचाच संभव फार. आणखी, जिच्याविषयीं प्रेमाची अशी वावटळ उठावी, कीं तिच्यांत सांपडतांच साऱ्या जिवाची उलटापालट व्हावी अशी तरुण स्त्री भेटण्याचाच योग हजारांतून एखाद्या तरुणाच्या आयुष्यांत येतो. आणि असा योग आल्या-वरही प्रेमाचा अनुभव घेण्याची धिटाई सर्वांनाच पत्करते असेंही नाहीं. " या ग्रंथकाराचें हें विधान केवळ तरुणतरुणींच्या प्रण-यालाच नव्हे, तर प्रेमाच्या सर्व प्रकारांना सारखेंच लागू पडत नाहीं काय ? बालकांच्या मनांत त्या त्या वस्तूवरील प्रेमही खेळा-पुरतें घटकाभरच असतें, तर त्याच्या हृदयाला विरहाची आंचही दीर्घकाल लागूं शकत नाहीं. पोटच्या मुलावर प्रथम प्राणापली-कडे प्रेम करणाऱ्या आईच्या हृदयांतच तो मुलगा मोठा होऊन मुलुखगिरीवर गेला, कीं विरहाचा कल्लोळ उठतो. आणि संसारा-वर अंगार ठेवून पांडुरंगावर निस्सीम प्रेम करणाऱ्या तुकाराम-बुवांच्याच तोंडून तो पांडुरंग भेटेना असें पाहून---

स्वप्नीं तोही कैसा न पडसी डोळां ।
सुंदर सांवळा घवघवीत ॥

असे तळमळीचे उद्गार निघतात. प्रेमाच्या तळमळीखेरीज विरहाचे उद्रेक संभवत नाहींत; आणि त्या तळमळीइतकेच अंतःकरणाला झोंबून निघालेले ते उद्रेकही क्वचितच आढळतात.

विरह व प्रेम एकमेकांशीं सापेक्ष आहेत, इतकेंच नव्हे, तर विरह ही केवळ दुःखाची दशा होय ही सामान्य समजूतही अगदीं चुकीची आहे. प्रियकराच्या विरहानें झुरणाऱ्या प्रणयिनीचें वर्णन करतांना त्या विरहानें तिला मृत्यूहूनही दारुण यातना झाल्या असें सांगणाऱ्या कवींनीं विरहावस्थेंत मनाचे गुणधर्म काय असतात, याचा अनुभव घेणें तर दूरच राहो, पण नीटसा अभ्यासही केलेला नसतो असेंच म्हटलें पाहिजे. प्रेमवस्तूची संगति व तिचा विरह या दोन अवस्थांचे गुणधर्म एकमेकांशीं सर्वस्वीं विरुद्ध असतात, व एका अवस्थेंत केवळ सौख्य व दुसरींत केवळ दुःख भरलेलें असतें, ही रूढ समजूत गृहीत धरून हे कवि काव्यरचना करतात. परंतु खऱ्या प्रेमाचा अलौकिक अनुभव ज्या अंतःकरणाला थोडा फार शिवला आहे त्याला तें काव्य पटणें कधींच शक्य नाहीं. विरहिणी राधेचें वर्णन करतांना आपण पुष्कळ म्हणूं कीं, त्या विरहावस्थेपेक्षां तिला मृत्यु बरा वाटला. परंतु स्वतः राधेच्या तोंडून त्या अवस्थेचें वर्णन ऐकावयास मिळालें तर तें फार निराळें असेल. विरहानें अंतःकरण व्याकुळ होतें हें खरें असलें, तरी या व्याकुळतेचें स्वरूप सर्वस्वीं

दुःखमय असतें ही समजूत भ्रामक होय. आपल्याला अत्यंत प्रिय अशा एखाद्या मृत मित्राविषयीं आपण चारचौघांच्या बैठकींत आठवणी काढूं लागलों म्हणजे आपल्या मनाची स्थिति कशी होते ? एकीकडे तो मित्र आपल्याला कायमचा सोडून गेला म्हणून दुःख वाटत असलें तरी त्याच्या अनेक स्वभावविशेषांच्या आठवणी आपल्याला सुखदायकच होत नाहींत काय ? सर्वांच्या अनुभवाला येणाऱ्या या दाखल्यावरून विरहव्याकुलता सर्वस्वीं दुःखदायक नसते ही गोष्ट वाचकांस पटावयास हरकत नाहीं. त्या व्याकुलतेला सुखाचा एक पदर असतो. शकुंतलेच्या विरहानें उसासे टाकणाऱ्या दुष्यन्ताला त्या उसाशांतही एक प्रकारचें सुख होत असतें. प्रेमवस्तूच्या प्रत्यक्ष उपभोगाइतकेंच तिच्या विरहांतही सुख भरलेलें आहे. प्रियकराची भेट होतांच होणाऱ्या आनंदाइतकाच आनंद त्याची आतुरतेनें वाट पहातांना होत असतो अशी कबुली स्त्रीहृदय तेव्हांच देईल. रात्रभर वाट पाहण्यांत जागून सुस्तावलेले डोळे, म्लान झालेला चेहरा, आकाशांत " माथ्यावर ढळलेला चंद्र ", गवाक्षांतून येणारी थंड वाऱ्याची झुळूक, आणि त्याच्या स्पर्शानें प्रियकरस्पर्शाची अधिकच जोरानें होणारी आठवण इत्यादि प्रकारांनीं विरहिणीच्या दशेचें वर्णन करणाऱ्या आपल्या मराठी लावण्या ज्यांनीं केल्या त्यांच्या ठिकाणीं खरी मर्मज्ञता होती असेंच म्हटलें पाहिजे. विरहाचें वैभव त्यांनीं जाणलें होतें असें दिसतें.

विरहाचें म्हणून एक स्वतंत्र, अवर्णनीय वैभव असतें

इतकेंच नव्हे, तर प्रेमवस्तूच्या उपभोगाचें ऐश्वर्य वाढविण्याचा गुण विरहामध्यें आहे हें विसरतां कामा नये. आई व लेकरूं यांच्यामधील वात्सल्यप्रेम काय, किंवा यौवनसुलभ प्रणयी प्रेम काय, किंवा परमेश्वर आणि भक्त यांच्यामधील शुद्ध भक्तीचें प्रेम काय, सर्व प्रकारच्या प्रेमाची गोष्ट अशी आहे कीं प्रेमविषयाच्या विरहाचा थोडासा काळ येऊन गेल्यानंतर पुन्हा तो मिळाला म्हणजे त्यापासून होणाऱ्या सुखाला अधिकच भरती येते. प्रीतींतील वस्तूंचा अखंड सहवास नको असें कोण म्हणेल? परंतु, विरहानंतर तो सहवास मिळाला कीं त्यांत कांहीं निराळ्याच सुखाची लकेर उत्पन्न होते हें तरी कोण नाकबूल करील? नायक व नायिका यांस मध्यंतरीं विरहव्याकुल करून नाटकाच्या अखेर त्यांस परस्परांची प्राप्ति करून देणारा नाटककार प्रेक्षकांचें चित्त वेधण्याच्या हेतूनें तशी रचना करीत असला, तरी अजाणतां तो एका महत्त्वाच्या विरहविषयक तत्त्वाचें प्रतिपादन करीत असतो असें म्हणावयास हरकत नाहीं. प्रातःकालचा सूर्यप्रकाश नेहमींच आल्हादकारक असतो यांत संशय नाहीं. परंतु, त्या घटकेला पावसाची एखादी सर येऊन गेली, आणि पुन्हा आकाश निरभ्र होऊन सूर्यकिरण पूर्ववत् फांकले म्हणजे मनाला विशेषच आल्हाद होतो हें कबूल केलेंच पाहिजे. विरहाची व प्रेमाची अशीच गोष्ट आहे. किंवा दुसरा दाखला द्यावयाचा झाल्यास आपण असें म्हणूं कीं, वर्षाकालांत पाऊस चांगला कोसळला तरच शेतें पिकतात हें जितकें खरें, तितकेंच आषाढांतील संतत जलवृष्टि झाल्यावर

महिनापंधरा दिवस चांगलें रखरखीत उन्ह पडलें तरच पिकें फांफावतात हेंही खरें आहे. या पिकांप्रमाणेंच प्रेमाचें आहे. विरहामुळें सहवाससुखाची गोडी अधिकच वाढते.

विरहाचा हा धर्म जेव्हां जेव्हां माझ्या मनांत येतो तेव्हां तेव्हां मला दुसरी एक कल्पना सुचते. ती ही कीं, प्रवासापासून होणाऱ्या अनेक फायद्यांची यादी अनेक निबंधकारांनीं आजपर्यंत केली खरी, पण सर्वांत महत्त्वाच्या अशा एका फायद्याकडे कोणाचेंच लक्ष गेलेलें नाहीं. पुण्याचे एक गृहस्थ एकदां दिल्लीला जावयास निघाले. ते आपल्या सामानाची बांधाबांध करीत असतांना त्यांचे एक स्नेही त्यांना भेटावयास आले व म्हणाले,

" आपण कुठें प्रवासाला निघाला आहांत कीं काय ? "

गृहस्थः—होय.

स्नेहीः—कुठें जाणार ?

गृहस्थः—पुण्याला.

ते स्नेही जरासे चमकले. त्यांनीं पुन्हा विचारलें, " काय पुण्याला ? "

गृहस्थ शांतपणें म्हणाले, " होय, पुण्याला निघालों. "

स्नेहीः—म्हणजे ? आपण तर पुण्याहून निघालांत, अन् पुण्याला जाणार हणतां, याचा अर्थ काय ?

गृहस्थः—अर्थ असा कीं, मुंबई, खांडवा, इटारसी, झांसी, दिल्ली, व पुन्हा झांसी, इटारसी, खांडवा, मुंबई या मार्गानें मी पुण्यास जाणार आहें.

त्या गृहस्थांच्या या विरोधाभासमय उत्तरांतील मर्म असें होतें कीं, पुण्यास ते इतके दिवस राहिले होते कीं, पुण्याचा त्यांना कंटाळा आला होता, पुण्यांत कांहीं स्वारस्य नाहींसें त्यांना वाटूं लागलें होतें, पुण्याचें वैभव पाहाण्यास त्यांची दृष्टि असमर्थ झाली होती, आणि दिल्लीकडे प्रवासाला जाऊन दोन तीन महिन्यांनीं ताज्या दृष्टीनें आपण पुण्यास परत आलों तरच खरें पुणें आपल्या दृष्टीस पडेल अशी त्यांची कल्पना होती. आणि ही कल्पना अगदीं यथार्थ आहे. प्रवासाचा खरा उद्देश परप्रांतांतील विविध स्थळें पाहणें हा नसून आपल्या स्वतःच्या गांवाकडे ताज्या दृष्टीनें पाहतां येऊन त्याची शोभा मनावर ठसविणें हाच होय, असें म्हटलें तर त्यांत काय वावगें आहे?

दूरच्या प्रवासाची पूर्णता करून मातृभूमीला परत आलें, कीं ती अधिकच आकर्षक व प्रिय वाटूं लागते, तद्वतच विरहाच्या कालानंतर प्रेमवस्तूचा सहवास अधिकच मधुर होतो. प्रतिक्षणीं नवी नवी सौंदर्याची लकेर जिच्या ठिकाणीं दिसते तीच खरी सुंदर वस्तु होय अशी व्याख्या आपण ऐकतों खरी, व ती एका दृष्टीनें खरीही आहे. परंतु सौंदर्य कितीही अप्रतिम असलें तरी त्याचा सारखा सहवास घडल्यानें त्यांत नवोन्मीलित शोभा दिसण्याऐवजीं आपल्या दृष्टीवर मालिन्य चढून त्या सौंदर्याच्या उपभोगांत उणेपणा येण्याचाच संभव अधिक हेंही खरेंच. पृथ्वीभोंवतीं एकाऐवजीं आळीपाळीनें दोन चंद्र प्रदक्षिणा घालीत असते तर किती बहार झाली असती अशी कल्पना मनांत अनेक वेळां येते;

पण रोज रात्रीं चांदणें पडूं लागलें कीं त्याची शोभा आपल्याला वाटणार नाहीं, हें विसरतां कामा नये. वद्यपक्षाचा विरहकाल आहे म्हणूनच द्वितीयेची चंद्रकोर पाहण्यासाठीं आपण आतुरतेनें क्षितिजाकडे पाहतों. प्रेमाची वस्तु आपल्याजवळ असावीशी वाटते; परंतु ती अष्टौप्रहर जवळ राहिली तर त्यापासून कितीसें सौख्य होईल हा प्रश्नच आहे. चिरसहवासानें आत्यंतिक सौख्य होतें असें मानणें मानवी मनोधर्माच्या विरुद्धच आहेसें वाटतें. उत्पत्ति, स्थिति व लय, आणि पुन्हा उत्पत्ति, स्थिति व लय अशा क्रमानें हें सबंध विश्वच फिरत आहे; तेव्हां त्या विश्वांतील मानवी मनानेंही त्या क्रमाचा आश्रय करावा, आणि त्या मनाला प्रियवस्तूच्या चिरसहवासापेक्षां विरहामुळें नवीनत्व पावलेल्या सहवासापासून अधिक सुख व्हावें यांत आश्चर्य तें काय ? बारा तासांचा विरह सोसल्यानंतरच माथ्यावर आलेल्या चंद्रकिरणांच्या चुंबनसौख्यासाठीं रत्नाकराचें हृदय उचंबळून येतें; आणि ज्याला नऊ महिने शब्दशः पोटांत ठेवलें, आणि ज्याला लक्षणार्थीं पोटांत ठेवण्याची जन्मभर लालसा राहील, त्या अपत्यालाही हातांत घेतल्यावर पुनःपुन्हा लांब धरून मग हृदयाशीं धरून त्याचे मुके घ्यावे असेंच आईला वाटतें.

सहवाससुखांत नाविन्याचें माधुर्य उत्पन्न करण्याचा हा विरहाचा धर्म पाहिला व पुनर्जन्मावर विश्वास असला तर मृत्यु ही गोष्टदेखील भयप्रद वाटण्याचें कारण उरणार नाहीं. माझे एक विनोदी स्नेही एकदां म्हणालेले मला आठवतें, कीं मनुष्यानें

जन्मास येऊन एकदां तरी क्लोरोफॉर्म घ्यावा; ज्यानें तो कधीं घेतला नाहीं तो एका अवर्णनीय अनुभवाला मुकला, त्याचा जन्म विफल होय! आपल्या प्रस्तुत विषयाच्या दृष्टीनें या त्यांच्या म्हणण्यांत बराच अर्थ नाहीं काय? घटका अर्धी घटका या जगाचा सर्वस्वीं विसर पडेल अशा अवस्थेंत राहून नंतर तिच्यांतून जागृत झाल्यावर प्रथम दृष्टि उघडतांच जगांत कांहीं निराळाच आनंद भरलेला दिसत असेल खराच! मृत्यूनंतर पुन्हा या जगावर दृष्टि टाकतां येईल किंवा नाहीं, आणि आपल्याला प्रिय असलेल्या व्यक्तींची पुन्हा भेट होईल किंवा नाहीं याविषयीं आपलें मन साशंक असतें म्हणूनच काय ती :मृत्यूची भीति! ही शंका नाहींशी झाली तर मृत्यु म्हणजे पुढें आपल्या प्रिय वस्तूशीं होणाऱ्या समागमांत सौख्याची भर टाकणारा विरहकाल यापलीकडे कांहीं नाहीं असेंच वाटेल!

—सप्टेंबर, १९२६

९

# शाई

अतिपरिचयात् अवज्ञा! नाहीं तर ' शाई ' या विषयावर ग्रंथ लिहिण्यांतच किती तरी शाई खर्च करतां येण्यासारखी आहे! निदान मला त्या वेळीं असें वाटलें खरें! मी सकाळीं कायसें लिहावयासाठीं टेबलाजवळ बसलों आणि दौतींत लेखणी—भलतेंच! टांक—बुडवितों तों शाई नाहीं. मुंबईच्या चाळींतल्या एखाद्या स्त्रीनें मोठ्या आशेनें नळावर जावें आणि पाणी गेल्यावर कोणीतरी खोलून ठेवलेल्या नळाचें कोरडें ठणठणीत तोंड तिच्या दृष्टीस पडावें म्हणजे तिला जसें होतें तसेंच थोडें फार मला झालें! उठलों, शेल्फवर शाईची मोठी शिशवी होती ती काढली, व दौतींत शाई ओतून घ्यावयासाठीं तिचें तोंड उघडूं लागलों. शिशवीच्या आंत डौलानें चमकणाऱ्या त्या मनोहर जांभळ्या द्रवाकडे पहातच रहावेंसें मला वाटलें.

एखाद्या मोत्यांतील पाणी चमकावें तसा तो द्रव पदार्थ दिसत होता. शर्यतीच्या मैदानांत सुटण्यास अधीर झालेल्या

अश्वराजानें साईसाच्या हाताला हिसके द्यावे व खुरांनीं जमीन खरडावी त्याप्रमाणें तो द्रव पदार्थ अधीरतेनें उचंबळत होता. बाटलीच्या बंदिखान्यांतून सुटून कागदाच्या ऐसपैस सफेत क्षेत्रावर त्याची क्रीडा झाली, कीं काय काय परिणाम होणार होते! तसाच विचार केला, तर त्या शाईतून काय वाटेल तें बाहेर पडण्यासारखें होतें. श्रान्त मनाला अखंड शान्तीचा लाभ करून देण्यासारखी धर्मचर्चा, पतितांना आशेचा किरण दाखविणारा भक्तिबोध, दुष्टांच्या डोळ्यांत अंजन घालणारी विवेकवाणी, रसिकांचें हृदय वेधणारी ललितकथा, अशा सुभग वस्तूंप्रमाणेंच सज्जनांच्या हृदयाला घरें पाडणारे लेख, अधमांना उत्तेजन देणारा वितंडवाद, श्रद्धावंतांना मूर्ख ठरविणारे कोटिक्रम किंवा शान्त चित्तावर भ्रान्तीची कृष्ण छाया पसरविणारें शब्दजाल, यांचींही बीजें त्या शाईत होतीं! आनंद, अनुराग, वात्सल्य इत्यादि दिव्य भावना, आणि राग, द्वेष, मत्सर इत्यादि भेसुर विकार यांची कोण गर्दी त्या शाईंत झाली होती! राष्ट्राराष्ट्रांमधील तहनामे हिच्याच पोटीं जन्माला येणार, आणि गुलामांच्या मुदतबंदीचे करारही हीच प्रसवणार! लाखों अनाथांच्या योगक्षेमासाठीं दिल्या जाणाऱ्या धर्मादायांचीं दानपत्रें हिनेंच मुद्रांकित होणार, आणि अज्ञ सनाथांना अनाथ करून दारोदार फिरावयास लावणारीं खोटीं गहाणपत्रेंही हीच कायम करणार! सुधा आणि हलाहल एकाच कोठ्यांत सांठविणारा किती अजब द्रव पदार्थ हा!

आणि हें जर खरें, तर मन मानेल त्यानें खुशाल यांत कलम बुडवावें? अखिल मानवजातीवर सुविचारांची शीतल पांखर घालणारे वृक्षराज, किंवा मनुजमात्रावर कुवासनांचा तप्त रस ओतणारे ज्वालामुखी पर्वत ज्या शाईंतून उद्भवण्याचा सारखाच संभव ती कोणींही घ्यावी, दौतींत ओतावी, आणि कलमाच्या मापानें मनसोक्त उधळावी? लक्ष्मीची बेगुमान उधळपट्टी पुरविली; पण या शाईला बेजबाबदार हातांचा स्पर्श झाल्यावर जगावर कोणतें संकट ओढवेल तें सांगतां येणार नाहीं. ज्यांना या बेजबाबदारीच्या पापकृत्याची भीति वाटत असेल त्या शाईच्या व्यापाऱ्यांनीं ती विकतांना प्रत्येक शिशीवर स्पष्ट अक्षरांत " केवळ सज्जनांसाठीं " असें लेबल मारलें, व दुर्जनांना शाई विकावयाचें नाकारलें, तर किती उचित होईल! स्फोटक द्रव्यें इकडून तिकडे पाठवितांना " जपून " अशी सावधगिरीची इशारत त्यावर चिकटवितात, तशी शाईच्या शिश्यांवर असावयास नको काय? मोटार हांकावयास परवाना, औषधें विकावयास परवाना, इतकेंच नव्हे तर लोकांचें चार घटका मनरंजन करावयासाठीं तोंडाला सफेती फांसायची म्हटली तरी परवाना घेतला आहे कां म्हणून विचारणाऱ्या सरकारनें शाई वापरण्याची सरसहा सर्वांना मोकळीक ठेवावी हें आश्चर्यच आहे! वास्तविक दारूगोळा किंवा समशेर हातीं घेणाऱ्या इसमाइतकीच दौतींत शाई ओतून घेणाऱ्या इसमावरही सरकारनें करडी नजर ठेवावयास हवी. शाई ही देखील समशेरीसारखीच शक्ति आहे.

पण मी म्हणतों शाईचा क्रयविक्रय करणारे व्यापारी, किंवा शाईवर एखादा कर बसवितां येईल कीं नाहीं येवढेंच पाहणारें संकुचित दृष्टीचें सरकार, यांपैकीं कोणालाही या द्रवाची सुप्त शक्ति कळली नाहीं, तरी जे या द्रवाच्या द्वारें साऱ्या मानवजातीशीं विचारविनिमय करतात त्यांनीं तरी ती सतत ध्यानांत वागविली पाहिजे, आणि एखाद्या यज्ञाला प्रारंभ करण्यापूर्वीं ज्याप्रमाणें यज्ञभूमि व सारें यज्ञसाहित्य पवित्र करून घेण्याची चाल होती त्याप्रमाणें स्वतःची मनोभूमि अभिमंत्रित केल्यानंतरच शाई दौतींत ओतून घेतली पाहिजे. कोणत्याही लेखकाच्या मनांत प्रत्येक वेळीं असें आलें पाहिजे कीं, या दिव्य शक्तीचा विनियोग मी सत्प्रवर्तनासाठींच करणार आहें ना? कोणत्याही अमंगल वासनेचा स्पर्श या वेळीं माझ्या अंतःकरणास झालेला नाहीं ना? तामसी विचारांनीं माझी बुद्धि जडावलेली नाहीं ना? अनाचार, अविद्या, असूया, यांच्या कल्लोळांत जगाला बुडविण्यांतच ज्यांनीं शाईचा सडा केला त्या भूतकालांतील पापी लेखकांच्या पिशाचांची सावली मजवर पडलेली नाहीं ना? ज्यांच्या लेखणींतून स्रवलेल्या शाईच्या थेंबागणिक अनाथ अबलांच्या अश्रूंचे थेंब वाहिले, आणि निरपराध जीवांच्या रक्ताच्या धारा उडाल्या, त्यांची परंपरा चालविण्याच्या मोहांत मी सांपडलों नाहीं ना? या द्रवाचें सिंचन करून मी जगांतील सात्त्विकताच वाढविणार आहें ना? शुद्ध, ओजस्वी आचारविचारांचें पीक ज्यांनीं आपल्या लेखांतून अव्याहत काढलें त्या

पुण्यवंतांच्या मेळयाबरोबरच मी चाललों आहें ना? भयभीतांचा धीर सावरणारा, दुःखितांचे अश्रू थांबविणारा आणि मूढांना मार्ग दाखविणारा संदेश ज्यांच्या ग्रंथांत मिळतो त्यांचीच सोबत या लेखनमार्गांवर मीं घेतली आहे ना?

या विचारमालिकेंत मी गुंतल्यामुळें माझ्या हाताकडे माझें लक्ष राहिलें नाहीं, व बाटली वांकडी होऊन शाईची मोठी थोरली धार माझ्या शुभ्र कपड्यांवर पडली. मला एकदम रागाची तिडीक आली व माझ्या वस्त्रांस कलंक लावणाऱ्या या द्रवाच्या अपकाराची चांगली परतफेड करावी असें क्षणभर वाटलें. ती कशी करणार? पण त्यावरून चट्कन् असा विचार मनांत आला कीं, मानवी संस्कृतीला कलंक फांसण्याचा विचार ज्या लेखकाला प्रथम सुचला त्याचीं वस्त्रें अशींच कलंकित करण्याचा उपमर्द शाईनें केला असला पाहिजे; व शाईवर सूड घेण्याच्या हेतूनेंच त्यानें तिला ' कृष्णकार्याकडेच लोक तुझा अधिक उपयोग करतील ' असा शाप दिला असला पाहिजे. किंवा असेंही असेल कीं, संसाराच्या कष्टमय मार्गांवर प्रकाश पडावा म्हणून ज्ञान-वंतांनीं आपल्या नरदेहाच्या वाती पेटवून जे दिवे लावले त्यांच्या काजळीपासूनच हा शाईचा द्रव तयार झाला, आणि कोणी अधम मतिमंदांनीं त्याचा कितीही दुरुपयोग केला तरी अखेर ज्या पुण्याईच्या आधारावर विश्वाचें पालनपोषण चाललें आहे ती वाढविण्याकडेच त्याचा अधिक विनियोग होणार यांत संशय नाहीं!

—ऑगस्ट, १९२८

# १०

# पत्रें

मानवी संस्कृतीला आलेल्या विविध फळांची तुलना केली तर पत्रांना चिमुकल्या, रसदार, मधुर काबुली द्राक्षांचीच उपमा द्यावी लागेल. काबुली द्राक्षांचें असें आहे कीं तीं पाहिल्याबरोबर मनाला मोह होतो; आणि शिवाय तीं सबंधच्या सबंध चटदिशीं खातां येतात. आपल्याला पत्रें आलीं कीं तीं देखील विलक्षण मोह घालतात. तीं घाईनें तरी वाचल्याखेरीज आपल्याला दुसरें कांहीं सुचत नाहीं. आणि तीं चट्कन् साद्यंत संपवितां येण्यासारखीं असून त्यांतील कोणताही भाग त्याज्य नसतो. द्राक्षांच्या पुष्कळ तऱ्हा आहेत; पण काबुली द्राक्षांचें माधुर्य आपल्याला अपूर्व वाटतें. कारण त्यांत बी नसते. जणुं तीं बीजावांचून, कारणावांचून, अगदीं विनाकारण बनलेलीं असतात. व म्हणूनच तीं अत्यंत गोड लागतात. पत्रांची गोष्ट अशीच नाहीं का? तीं जितकीं विनाकारण लिहिलेलीं असतील तितकी त्यांच्यावर आपली प्रीति अधिक जडते. " पत्र लिहिण्यास कारण कीं " असल्या प्रारंभाचीं पत्रें आपल्याला रिझवूं

शकत नाहींत. पत्रांत एखाद्या कामाचा तेवढाच उल्लेख असला म्हणजे द्राक्षांतल्या बीसारखा तो त्रासदायक वाटतो. त्यानें आपली रुचि बिघडते. तीं कामाचीं पत्रें आपण कामापुरतींच वाचतों, आणि काम संपलें कीं त्या पत्रांचें जीवितही संपतें. त्यांची चिरफाड करून आपण त्यांच्या अस्थि केराच्या टोपलींत टाकतों. उलट, ज्यांत कसल्याही महत्त्वाच्या कामाचा निर्देश नाहीं असलीं आपल्या प्रीतींतल्या माणसांकडून आलेलीं पत्रें पुनःपुन्हा वाचलीं तरी आपलें पुरें समाधान होत नाहीं; आणि जडजवाहीर जतन करून ठेवावें तशीं तीं आपण ठेवतों. असल्या पत्रांत एखादें तर असें असतें, कीं तें आपण कां जपून राखून ठेवावें याचें तिऱ्हाइताला कोडेंच पडेल. माझ्या संग्रहांतील एका पत्रांत फक्त पुढील मजकूर आहे:—

" आपण ता. १२ ला येणार हें समजलं. शेवटीं आमचं नशीब उघडलं म्हणायचं! पण हे बारा दिवस लोटायचे कसे ? मला तर ते इतके जड वाटतात कीं, ते दूर करायसाठीं माझ्या आयुष्यांतूनच तेवढा काळ काटला गेला तरी माझी तयारी आहे. "

दुसऱ्या एका पत्रांत तर,

" आम्ही कालच पांचगणींत आलों. इथलीं निसर्गाची निःसीम स्तब्धता आल्हादकारक वाटण्याऐवजीं मला तिची भीतिच वाटते आहे. कां कोणास ठाऊक ! "

येवढाच मजकूर आहे.

हीं पत्रें मीं कां जतन केलीं आहेत असें कोणीं विचारलें तर त्याचें समाधान करणें सोपें नाहीं. कारण, त्या पत्रांत शब्दांच्या अर्थापेक्षां पुढेंमागें जो भावनेचा अन्वय आहे त्याचेंच सारें महत्त्व आहे. व तो अन्वय दुसऱ्याला सांगून कितीसा कळणार ? याच दृष्टीनें पत्रांतील मजकुरापेक्षांही आरंभींच्या मायन्याला आणि अखेरच्या सहीलाच अधिक महत्त्व असतें. लिहिणाराच्या अंतःकरणांतील भावना त्यांतच बहुतांशीं व्यक्त होत असतात आणि त्या तो मोठ्या हौशीनें व्यक्त करीत असतो. कारण मानवी व्यवहाराची एक विचित्र तऱ्हा अशी आहे कीं, एखाद्या व्यक्तीबद्दल जी प्रीति आपल्या मनांत असते ती प्रत्यक्ष भेटींत व बोलण्याचालण्यांत दाखविण्याचा आपण संकोच करतों; पण पत्रांत मात्र ती उघड केल्यावांचून आपणांस राहवत नाहीं. एकदां असें झालें, माझ्या एका निकटच्या स्नेह्यांना मीं पत्र लिहून ठेवलें, पण टपालाची वेळ गेल्यामुळें तें मीं टाकलें नाहीं. त्या पत्रांत मध्येंच मीं असें लिहिलें होतें:–

"आपण माझ्यावर एवढा लोभ करतां त्याचा मी उतराई कसा होऊं ? वास्तविक आपली योग्यता किती मोठी, व आपल्या व माझ्या वयांतील अंतरही किती मोठें ? पण आपलें अंतःकरण इतकें रसिक व प्रेमळ आहे कीं, माझ्याशीं वागतांना आपण आपला मोठेपणा विसरतां. आपल्याशीं माझा स्नेह असावा यांत मला धन्यता वाटते......"

आणि अशाच स्वरूपाचा आणखी किती तरी मजकूर होता. पण योगायोग असा कीं, तें पत्र टाकलें गेलेंच नाहीं. दुसऱ्या दिवशीं ते स्नेहीच अचानक गांवाहून आले व त्यांची माझी प्रत्यक्षच भेट झाली. त्यांच्या भेटीनें मला अर्थातच अत्यानंद झाला. पण एका गोष्टीनें मनाचा विरस झाला. माझ्या अंतः-करणांतील ज्या माझ्या भावना त्यांना कळल्या असल्या त्या त्या पत्राबरोबर तशाच राहिल्या. त्यांच्या प्रत्यक्ष तोंडावर त्यांतील अवाक्षरही माझ्या ओंठाबाहेर पडलें नाहीं. आणि माणसाला तें बोलवत नाहीं हेंच खरें. तसें म्हटलें तर "मत्प्रिय श्रीयुत अमुक अमुक" असें आपण पत्रांत लिहितों. पण तशी कां आपण त्या गृहस्थांना हांक मारूं? पत्रांचें खरें मर्म हेंच आहे. जें बोलायला संकोच वाटेल तें जिव्हाळ्याचें बोलणें बोलण्याची सोय तीं करून देतात. एरव्हीं जें आपल्याला वदवणार नाहीं तें आपण पत्रांच्या साहाय्यानें बोलतों. प्रियसखींच्या सांगण्याप्रमाणें दुष्यंताला उद्देशून कमलपत्रावर प्रणयपत्रिका लिहितांना, नीट खुशाल स्वतःची प्रणयविद्ध अवस्था नमूद करणाऱ्या शकुंतलेनें, जरा वेळानें आकस्मिकपणें दुष्यंत भेटतांच, व त्याच्याशीं एकांतांत राहतांच "मी तप्त जरी मदनशरें विनय सोडुं कां?" असें म्हणावें यांतील स्वारस्य हेंच नाहीं काय? प्रेमाची भाषा वाच्य शब्दांपेक्षां लेख्य शब्दांच्या आसऱ्यानेंच चांगली वाहते. संकोचानें बंद राहणारीं अंतःकरणें पत्रांत खुलीं होतात.

म्हणूनच असें म्हणावेंसें वाटतें कीं, परस्परांवर प्रेमासक्त

असलेल्या माणसांनीं अष्टौप्रहर आणि बारा महिने तरा काळ एकत्र राहण्याऐवजीं मधून मधून एकमेकांपासून जरा दूर व्हावें, हें चांगलें. प्रियजनांच्या सतत सहवासाची सारखी आसक्ति असणें हें प्रेमाचें मुख्य लक्षण आहे हें खरें, आणि निरंतरच्या सहवाससुखाची गोडी निरुपम आहे यांतही शंका नाहीं. परंतु प्रेमाच्या अवीटपणालाही मर्यादा आहेच, आणि ती मान्य न करण्यांत प्रेमाविषयींच्या निष्ठेपेक्षां हटवादीपणाचाच भाग अधिक दिसून येईल. कारण या एकंदर विश्वाच्या सौंदर्याचा उगम स्थित्यंतरांत असतांना प्रेमच तेवढें त्या नियमाला अपवाद कसें ठरेल! प्रेमालाही पालट पाहिजेच. हा पालट नसतां-नाही प्रेमी माणसें आनंदांत असतील; नाहीं असें नाहीं. पण एकमेकांपासून कांहीं काळ दूर झाल्यानंतर पत्ररूपी जो एक मधुर प्रेमप्रकार अनुभवावयास मिळतो त्याला तीं विनाकारण मुकतील येवढें तरी खचित म्हटलें पाहिजे.

जिव्हाळ्याच्या माणसाकडून आलेलें पत्र वाचणें, आणि जिव्हाळ्याच्या माणसाला पत्र लिहावयास बसणें यांत जो अत्यंत नाजूक सुखाचा प्रकार आहे त्याला दुसऱ्या कशाची उपमाच नाहीं. अंतरंगांतल्या माणसाचें पत्र आलें कीं, तें आपण किती हळुवारपणानें फोडतों! त्या माणसाचें बोलणें जितक्या कौतुकानें आपण झेलतों तितक्याच हळु हातांनीं आणि भुकेल्या अंतःकरणानें तें पत्र आपण उघडतों. आणि अशा माणसाला पत्र लिहावयाच्या वेळीं तर आपल्या मनाची

जी धांदल उडते ती त्रयस्थाला वेडेपणाचीच वाटेल. देवाची पूजा करायच्या वेळेस सारें साहित्य अत्यंत निर्मळ पाहिजे असें जसें भाविकाला वाटतें तसेंच कागद, टांक, साऱ्या गोष्टी टापटिपीच्या असाव्यात अशी हृदयाला ओढ लागलेली असते. इतकेंच काय, स्वतःचा चेहरा अमंगल, अधूत असला आणि अंगावरचे कपडे मलीन असले तर त्या वेषांत आपल्या आवडीचें पत्र लिहावयास आपण तयार नसतों. आणि गंमत अशी कीं, आपल्याला आलेल्या प्रेमपत्रांत मात्र कुत्र्या-मांजरांच्या पायांसारखें अक्षर असलें, ओळीगणिक ऱ्हस्वदीर्घांच्या दहा चुका असल्या आणि जागोजाग शाईचे ठिपके पडले असले तरी ते आपल्याला दूषणीय वाटण्याऐवजीं मनोहरच वाटतात !

अशा प्रकारें प्रीतींतल्या माणसापासून दूर होऊन परस्पर पत्रें लिहिण्यावाचण्यांत एक अवर्णनीय गोडी आपल्याला वाटावी यांत आश्चर्य नाहीं. वास्तविक स्वरूपावर अवास्तव स्वरूपाचा मुलामा देऊन त्याकडे पाहणें हें साऱ्या कलेचें रहस्य आहे, आणि असल्या कलाविलासांतून निरुपमेय आनंदाचा उद्भव होत असतो. या आनंदाच्या मोहानेंच एकत्व हें ज्याचें वास्तविक रूप आहे त्या ब्रह्माला अनेकत्वाचें नाट्य करण्याची प्रेरणा झाली म्हणतात. अर्थात् निरतिशय प्रेमाच्या माणसांत पूर्ण अभिन्नत्व उत्पन्न झालें असतांनाही कांहीं काळ एकमेकांत स्थलकालाचा अंतरपाट उभा करून, भिन्नतेचें अवसान आणून, एकमेकाला प्रेमानें ओथंबलेलीं पत्रें लिहिण्यांत त्यांना विलक्षण

सुख व्हावें हें साहजिकच होय. पत्रांच्या सुवर्णपात्रांतून मिळणारी ही सुरसुधा ज्यांनीं चाखली नाहीं ते अभागी होत. तिच्या उन्मादानें प्रेमाला नवजीवन यावें यासाठीं तरी प्रियजनांनीं मुद्दाम कांहीं काल विरह पत्करावा. सारखीं गर्द छायेखालीं राहिलेलीं फुलझाडांचीं रोपें खुरटतात, आणि त्यांच्यावर सूर्यताप पडल्यावर तीं फुलतात. त्याप्रमाणें नित्य सहवासाच्या शीतलतेनें अंतः-करणांतील प्रेम खुरटण्याची भीति असते, व त्यावर विरहतापाचे किरण पडून पत्रांतील मधुर विभावांचें नवजीवन त्यास मिळालें कीं तें विकास पावतें. विभक्तीवांचून भाषेचा विलास जसा बंद पडेल तसाच विरहाच्या विभक्तीवांचून आणि त्या समयीं लिहिल्या जाणाऱ्या पत्रांवांचून प्रीतीचा ताजेपणाही कायम राहणार नाहीं.

—सप्टेंबर, १९२८

# मित्र

या जगांत बहुतेक प्रत्येकजण पुरेसा पैसा जवळ नाहीं म्हणून, किंवा पुरेसा कपडालत्ता नाहीं म्हणून, किंवा पुरेसे ग्रंथ वाचावयास मिळत नाहींत म्हणून तक्रार करीत असतो; पण पुरेसे मित्र मिळत नाहींत म्हणून दुःखीकष्टि झालेला एक तरी माणूस दिसतो कां ? अमुक इतकी संपत्ती आपल्याला सांठविली पाहिजे अशी महत्त्वाकांक्षा प्रत्येक मनुष्यानें मनाशीं ठरविलेली असते; व तेवढी संपत्ति जोंपर्यंत मिळाली नाहीं तोंपर्यंत त्याचा जीव सुखी नसतो. पण असें कोणीं कधीं मनाशीं म्हटलें आहे कां, कीं मला पांच मित्र जोडलेच पाहिजेत, आणि ते जोंपर्यंत मला लाभले नाहींत तोंपर्यंत मला हें जीवित नीरसच वाटेल! आपल्याला दोन मित्र असले काय, आणि कांहीं प्रसंगामुळें त्या दोहोंचे दहा झाले काय, आपण सारख्याच संतुष्ट वृत्तींत असतों. मित्र वाढले त्या मानानें आयुष्याची रमणीयता वाढली असें होत नाहीं. दोनच मित्र असले तरी कोणी असें हळहळत नाहीं, कीं, 'केवढें हें माझें दुर्भाग्य! परमेश्वरा, मला आणखी स्नेह्यांचा

लाभ होणार नाहीं काय ?' आणि ज्याला दहा स्नेही आहेत तोही कधीं अशा मिजासींत नसतो, कीं दुनियेला जें लाभलें नाहीं तें मला लाभलें आहे. मित्रांची संख्या फुगली काय किंवा रोडावली काय, आपलें सुखदुःख असतें तेवढेंच असतें. आहेत तेवढ्या मित्रांवर प्रत्येजण संतुष्ट आहे.

किती विचित्र हें !

पण याचें कारण असें कीं, मित्र या शब्दांतील खरें मर्म फारच थोड्या लोकांच्या अनुभवाला आलेलें असतें. बहुतेक लोक खऱ्या मैत्रीच्या प्रत्ययाला मुकलेले असतात व प्रत्यया-वांचूनच मित्र हा शब्द ढिलेपणानें सरसहा वापरीत असतात. एखाद्याचा अधिक सहवास झाला, कीं लगेच त्याचा मित्र म्हणून उल्लेख करण्यांत येतो. जणुं काय मैत्री हें सहवासाच्या वेलीला हमखास येणारें फळच आहे ! खरें पाहतां सहवास व मैत्री यांच्यांत अन्योन्याश्रय फारच थोडा आहे. वाढत्या सह-वासाबरोबर मित्रभाव परिपक्व व मधुर होत जातो यांत संशय नाहीं. परंतु सहवास वाढला कीं, त्या मानानें स्नेह उत्पन्न झालाच पाहिजे असें समजणें म्हणजे जाईची वेल मांडवावर पोंचण्याइतकी वाढली, कीं तिला बहर आलाच पाहिजे असें म्हणण्यासारखें आहे. पुष्कळदां वेल मांडवभर पसरली तरी फुलत नाहीं, तद्वत् वर्षानुवर्ष सहवास घडूनही खरा मित्रभाव उद्भवत नाहीं, आणि नुसत्या सहवासालाच लोक मैत्री समजत असतात. पण किती भ्रामक समजूत आहे ही !

ज्यांनीं वीस पंचवीस वर्षें एकाच कचेरींत शेजारशेजारच्या टेबलांवर कारकुनी केली अशा दोन माणसांत गाढ मैत्री आहे असें निश्चयानें म्हणतां येईल काय? इतका वर्षानुवर्षांचा सहवास घडूनही त्या दोन व्यक्तींत परस्पर आकर्षण व सहानुभूति उद्भवली नसण्याचाच संभव अधिक नसतो काय? तसें कशाला, ज्यांचें व आपलें लहानपण एकाच ठिकाणीं गेलें, ज्यांच्याशीं मिळून मिसळून खेळतां खेळतां आपण लहानाचे मोठे झालों, आणि जे व आपण एकाच शाळेंत शिकलोंसवरलों, त्यांना आपण बालमित्र म्हणतों, व जगाची अशी समजूत असते कीं, बालमित्र म्हटला कीं तेथें मित्रत्वाची पराकाष्ठा झाली. याच कल्पनेनें बालमित्र किंवा लंगोटीमित्र ही अगदीं जिव्हाळ्याची संज्ञा समजली जाते. पण बालमित्राशीं हा जिव्हाळा खरोखरच असतो काय? मोठेपणीं बालमित्र एके ठिकाणीं आले कीं एकमेकांला अरे जारे अशा एकेरी नांवानें संबोधून बोलतात हें खरें; व ज्यांच्याशीं सारे लोक मोठ्या अदबीनें वागतात अशा मोठ्या माणसांना कोणीं अरे जारे म्हटलेलें ऐकलें कीं, तिऱ्हाईत माणसांना तो एक विशेष कौतुकाचा प्रकार वाटतो हेंही खरें. पण यापलीकडे बालमित्रांचें परस्परांशीं जें वर्तन होतें त्यांत कांहीं माधुर्य असतें काय?

तें नसणेंच निसर्गसिद्ध आहे. बाळपणीं जे एकत्र खेळले सवरले त्यांनीं अगदीं भिन्न मार्गांनीं आयुष्याचें आक्रमण केलेलें असतें, त्यांच्या ठिकाणीं परस्परविरुद्ध आवडीनिवडी उत्पन्न झालेल्या असतात, त्यांचीं अंतःकरणें भिन्न भिन्न नाजूक बंधनांत सांपड-

लेलीं असतात! एखाद्या दरींत ध्वनीचा प्रतिध्वनि घोंटाळत रहावा त्याप्रमाणें त्यांच्या बालपणांतील सहवासाची आठवण तेवढी रेंगाळत राहिलेली असते, व त्या स्मृतीबद्दलची निष्ठा दाखविण्याच्या आविर्भावानेंच ते एकमेकांला एकेरी रीतीनें संबोधतात! वर्षाकाळीं जेथून पाण्याचे ओहोळ वाहिले, त्या खडकावर पुढें फक्त एक रेघ उमटलेली दिसत रहावी, त्याप्रमाणेंच आपलें आपल्या बालमित्रांशीं होणारें सलगीचें वर्तन असतें. तें दिसावयास सलगीचें दिसतें पण त्यांत खऱ्या मित्रभावाचा मागमूसही नसतो. बालमित्रांविषयीं जो आपण आत्मभाव दाखवितों त्यांत केवळ एक रूढि पाळण्यापलीकडे आपली बुद्धि क्वचित्च असते. सारांश, सहवास आणि मैत्री यांचा निश्चित कार्यकारणभाव मानतां येणार नाहीं. मैत्री ही स्फुलिंगासारखी आहे. ती केव्हां प्रगट होईल तें सांगतां येत नाहीं. कित्येक वर्षांच्या सहवासांत ती अप्रगट राहील. अत्यल्प सहवास घडलेला असूनही ती प्रगट होऊन दोन अंतःकरणें प्रदीप्त करील.

सहवासालाच मित्रभाव समजण्यांत जशी लोकांची चूक होते तशीच त्यांची दुसरी एक चूक होत असते. मित्र म्हटला, कीं तो सदैव आपली प्रशंसा करणाराच असला पाहिजे अशी सामान्य कल्पना असते. पण मैत्री म्हणजे प्रशंसेचा निरंतर झरा समजणें कितपत बरोबर आहे? माणसाला प्रशंसाच हवी असली तर ती मिळविणें कांहीं कठीण नाहीं. चार पैसे टाकून प्रशंसा बाजारांत खरेदी करितां येत नाहीं हें खरें; पण रुपेरी चाबकानें कोणतेंही

थोडें वळणीवर येतें या न्यायाला प्रशंसा कांहीं अपवाद नाहीं. चार पैसे आपल्याजवळ असले तर प्रशंसक भोंवतालीं सहज जमतात. पैसा, सत्ता, कला, असल्या बळावर स्तुतिपाठकांचा वाटेल तेवढा तांडा जमा करतां येतो. धनिकाभोंवतीं, राजाभोंवतीं किंवा कीर्तिसंपन्न झालेल्या नटाभोंवतीं खुषमस्करे किती असतात पहा! पण हे खुषमस्करे म्हणजे त्यांचे मित्र कां म्हणावयाचे? ते सारखे मधुर भाषण करीत असतात. मधाच्या पोळ्यांतून थेंब गळावे त्याप्रमाणें त्यांच्या शब्दांतून प्रशंसा गळत असते. पण मधुप्रलापी सहस्र प्रशंसकांच्या गराड्यांत वावरणारा राजा, धनिक किंवा नट खऱ्या मित्रभावाचें एखादें तरी शीतळ स्थान आपल्याला मिळेल कां म्हणून जेव्हां पाहतो तेव्हां त्याला सारें जग तप्त, रूक्ष अरण्याप्रमाणेंच बहुतकरून भासतें.

प्रशंसा व मित्रभाव या भिन्न गोष्टी आहेत. योग्य वेळीं खरा मित्र प्रशंसा करील हें सांगावयासच नको; आणि खऱ्या मित्राकडून मिळालेल्या प्रशंसेच्या शब्दाचीच काय, पण नुसत्या दृष्टिक्षेपाची सर दुसऱ्या कसल्याही पारितोषकाला येणें शक्य नाहीं हेंही खास. परंतु कारण नसतांना प्रशंसा करणें हा खऱ्या मित्राचा धर्मच नव्हे. वीणेच्या तारांवरून केव्हांही बोट फिरविलें तरी त्यांतून आपल्याला आल्हाद देणारा मधुर नादच निघतो. पण खऱ्या मित्राच्या हृदयाच्या तारा अशा नसतात. आपण सत्कृत्य केलें तर त्या तारांतून गौरवाचे गोड शब्द निघतील; पण आपण चुकत असलों तर अनुशासनाचा गंभीर शब्द त्यांतून निघाल्याखेरीज राहणार

नाहीं. सदासर्वदा नम्र भाषणांनीं रिझविणें हें मित्राचें कार्य नाहीं. आपलें चुकतें पाऊल जो फिरवितो आणि जाणारा तोल जो सांवरतो तोच आपला खरा मित्र होय. मित्र म्हणजे केवळ आपल्या जीविताचे अलंकार नव्हेत. आपल्या जीवितप्रवाहाला योग्य वळण देणारे ते तट आहेत. काजव्यांचे थवेच्याथवे जर आपल्याला दिसले तर त्यांची शोभा मोठी रमणीय वाटल्या-वांचून राहात नाहीं. पण त्या शोभेचा उपभोग घेण्यासाठीं आप-ल्याला अंधकारांत रहावें लागतें. आपल्याला वाममार्गांच्या अंधारांत टाकून केवळ आपल्याला क्षणभर सौख्य देणाऱ्या या काजव्यांप्रमाणें खरे मित्र नसतात. खरा मित्र सूर्यासारखा असतो. त्याच्या सान्निध्यांत असतांना पूर्ण प्रकाशांत असल्याचा भरंवसा आपल्या मनाला वाटत असतो, व त्याच्या साक्षीनें वावगें कृत्य करण्याची आपल्याला शरमच वाटते. म्हणूनच सूर्याला मित्र म्हणतात कीं काय कोण जाणे! त्या त्या प्रसंगीं सुमधुर प्रशंसा, धीर गंभीर शब्द, प्रेमळ उत्तेजन, सहानुभूतिमय सांत्वन, आणि कठोर उपदेशवाणी ज्याच्याकडून लाभते तोच खरा मित्र होय. आपल्याला सुखविण्याच्या वेळीं तो कुसुमाहून मृदु असतो, आणि आपल्याला जागृत ठेवण्याच्या वेळीं तो वज्राहून कठिण होतो.

आणि असें आहे यांत नवल नाहीं. कारण सारी खरी प्रीति याच स्वरूपाची आहे, आणि मित्रभाव हा एक प्रीतीचाच प्रकार होय. इतकेंच नव्हे तर वैषयिक सुखाव्यतिरिक्त मित्रभावाचा

विलास होत असल्यामुळें त्याला शुद्ध प्रीतीचें एक उत्कृष्ट स्वरूपच म्हटलें पाहिजे. मात्र अशा या शुद्ध प्रीतीचा अनुभव सगळ्यांनाच मिळतो असें नाहीं. खरे मित्र शोधून काढूं म्हटल्यानें सांपडत नाहींत, किंवा अमक्या रीतीनें त्यांची वाट पहात राहिलें कीं ते आपल्याला येऊन भेटतात असेंही नाहीं. मृगोदरांतील कस्तुरीसारखाच त्यांचा वास असतो, पण तितकेच ते दुर्मिळ असतात. आपल्या उत्कट प्रीतीचा बाण अचूक लागून ते केव्हां मिळतील तेव्हां मिळतील! ते ज्यांना मिळतात त्यांचें भाग्य अलौकिक समजावें! मात्र त्यांचा लाभ आपल्यालाही घडेल या आशेंत आपल्यापैकीं प्रत्येकानें कां नसावें? समुद्रांत शिंपल्यांनीं सदा आशेनें उन्मीलित असावें हें बरें. कारण स्वातीच्या जलधारा केव्हां पडतील आणि ते जलबिंदु शिंपल्यांत शिरून त्यांचीं मौक्तिकें केव्हां होतील त्याचा काय नियम?

—ऑक्टोबर, १९२८

१२

# पाऊस

कवि मोठे लहरी आणि एककल्ली असतात, यांत संशय नाहीं. एखाद्या गोष्टीची प्रशंसा करावयाचें त्यांनीं मनाशीं ठरविलें, कीं जिभेला शीण आला तरी ते तिची तारीफ चालू ठेवतील, आणि दुसरी एखादी गोष्ट तितकीच सुंदर व प्रशंसनीय असली तरी तिचें त्यांना भान राहील तर शपथ! एखाद्या दृष्टान्ताचा किंवा आदर्शाचा संकेत त्यांनीं एकदां ठरविला, कीं मग पुनःपुन्हा तोच ते वापरीत राहतील. त्याहून अधिक समर्पक असा एखादा दृष्टान्त शोधण्याची खटपट कधीं त्यांच्या हातून व्हावयाची नाहीं, आणि कोणीं सुचविला तरी त्यांच्या हट्टी बुद्धीला तो पटावयाचा नाहीं! तसें नसतें तर 'कमलाक्षी,' 'चंद्रवदना' असले शब्द केव्हांच कोशांतून हांकलले गेले नसते कां?

ज्या कवीनें उठावें त्यानें वसंत ऋतूला 'ऋतुराज' म्हणावें हाही कवींच्या आंधळ्या हटवादीपणाचाच मासला नव्हे काय? ऋतुराज म्हणजे इतर सर्व ऋतूंहून ज्याची थोरवी मोठी तो,

असेंच ना? पण ही पदवी कोणा अविचारी कवीनें कधीं एकदां वसंताला देऊं केली म्हणून ती कवींच्या हजारों पिढ्या उलटल्या तरी चालूच रहावी? वसंतऋतु खरोखरच वैभवानें इतका थोर आहे काय, कीं त्याच्यापुढें इतर ऋतु म्हणजे अगदीं सामान्य आणि अकिंचन ठरतील? वसंताच्या नानाविध शोभेविषयीं संशय नाहीं. आम्रमंजिरींच्या स्पर्शानें सुगंधित झालेल्या वायुलहरी, उन्मत्त पिकांच्या शब्दांचें व गर्द वनांत उठणाऱ्या त्यांच्या प्रतिध्वनींचें संगीत, प्रियकरासाठीं अत्युत्सुक झालेल्या परंतु प्रथमालिंगनाच्या कल्पनेनें किंचित् भेदरलेल्या रमणीलाच शोभेल अशा उत्कंठेनें भरल्यासारख्या दिसणाऱ्या दिशा—अशी वसंताची अनेकविध रम्य शोभा असते याबद्दल वाद कोण घालील? पण म्हणून इतर सर्व ऋतूंहून तो श्रेष्ठच ठरतो असें मात्र नव्हे. कवींच्या विरुद्ध माझी तक्रार आहे ती या मुद्द्यापुरतीच.

एखाद्या बापानें आपल्या सहा मुलांपैकीं एकाचेच गुण उठल्या सुटल्या गावेत, व इतर मुलगेही त्याच्याइतकेच सुंदर व सद्‌गुणी असूनही त्यांजकडे कानाडोळा करून त्या एका मुलालाच सर्वश्रेष्ठ ठरवावें तसें कवींचें वसंत ऋतूच्या बाबतींत झालें आहे. प्रणय-चेष्टांचे प्रसंग वर्णावयाचे झाले, कीं वसंत ऋतूहून दुसरें वातावरण लेखकाला सुचतच नाहीं. प्रियजनांच्या आलिंगनाच्या चित्रांत वसंत ऋतूखेरीज दुसरी पार्श्वभूमीच शोभत नाहींसें कवींनीं ठरवून ठेविलें आहे. वल्लभरमणींच्या कूजितसंगीताला वसंताच्याच तराफीच्या तारा वाजल्या पाहिजेत हा त्यांचा हट्ट!

संस्कृत व मराठी ललितवाङ्मय पाहिलें तर वसंत ऋतूच्या शोभेचीं स्तुतिस्तोत्रें खंडीभर निघतील! पण इतर ऋतूंच्या शोभेच्या वेळीं कवींची जशी कांहीं दांतखीळ बसते! 'ऋतुसंहारां'त वसंताचें वर्णन केवढ्या वक्तृत्वानें कवीनें केलें आहे पहा! इतर ऋतूंच्या वेळीं मात्र त्यानें आपल्या काव्याचे फवारे मोठ्या मिनतवारीनें धारेला उभ्या राहणाऱ्या नाठाळ गाईसारखे सोडले आहेत!

खरें पाहतां इतर ऋतूही रमणीयतेच्या बाबतींत वसंताइतकेच सरस ठरतील. वर्षाऋतूच पहा. त्याची नानाविध शोभा काय कमी बहारीची असते?

मला स्वतःला तर पावसाळ्यांतली पहिली पावसाची सर म्हणजे मूर्तिमंत काव्य वाटतें. मृग नक्षत्रांतल्या त्या पहिल्या पावसाचें सौंदर्य वर्णावें तेवढें थोडेंच होईल. नोच प्रकृतीच्या मंत्रिमंडळाची चिथावणी मिळाली, कीं ज्याप्रमाणें एखाद्या जुलमी राजाच्या छळाला भर यावा त्याप्रमाणें ग्रीष्मांतल्या चंडांशूचा ताप साऱ्या सृष्टीला असह्य झालेला असतो, व सृष्टीचा जीवन-रसाचा सांठा संपत आलेला असतो. संत्रस्त प्रजेनें एखाद्या उद्धा-रक महात्म्याची वाट पहावी तद्वत् सारी सृष्टि जलधारांसाठीं आ वासून बसलेली असते. आईच्या सहवासाला फार दिवस अंतरल्यावर बालकाचें तोंड सुकावें तद्वत् वृक्षशाखांवरचीं चिमुकलीं पानें म्लान आणि दीन दिसत असतात. सौभाग्य-चिन्हांनीं भरलेला असला तरच सुंदर दिसणारा सुवासिनीचा हात

त्यांवांचून रिकामा आणि अशुभ वाटावा तशी नदीच्या पात्रांची अवस्था झालेली असते. राजमार्गांतून आणि मातीच्या ढेकळांनीं विखुरलेल्या शेताभातांतून वाफा निघत असतात त्या जणुं काय जलवृष्टीसाठीं धरणीनें केलेल्या आर्तस्वरांतल्या प्रार्थनाच वाटत असतात!

आणि अशा वेळीं वर्षाऋतूंतील पहिला पाऊस आला, कीं तो क्षणांत केवढी क्रान्ति करून टाकतो! वृक्षांचीं पानें एकदम टवटवीत होतात, मैदानावरची सुकलेली हिरवळ एकदम तेजस्वी दिसूं लागते, भूभागावरची खेदाची व उदासपणाची धूळ दाबली जाऊन तेथें ताजेपणा उत्पन्न होतो, आणि दशदिशांत एक प्रकारचें मांगल्य भरल्यासारखें वाटूं लागतें. मी तर पहिल्या पावसाच्या मंगल घटकेची प्रतिवर्षीं चातकाइतक्याच उत्कंठेनें वाट पहात असतों. भूगर्भांत अनंत चमत्कार आहेत यांत संशयच नाहीं; परंतु विलासमंदिरांतलीं सारीं अत्तरें ज्यापुढें कवडीमोल ठरतील अशा सुगंधाचा जो चमत्कार वर्षाकालाच्या पहिल्या धारांच्या स्पर्शाबरोबर भूगर्भांतून बाहेर पडतो त्याचें वर्णन कोणाची लेखणी करूं शकेल? मी कॉलेजांत इंटरमीजिएटच्या वर्गांत होतों व 'सप्तपदार्थी' शिकत होतों तेव्हां 'पृथिवी गंधवती' हें लक्षण मला कित्येक दिवस कळलें नव्हतें. पण त्या वर्षीं पडलेल्या मृगाच्या पहिल्या पावसानें तें माझ्या मनावर सहज आणि पक्कें बिंबविलें!

जलधारांच्या पहिल्या घुटक्याबरोबर हवेंत दरवळणाऱ्या त्या

मृत्तिकागंधाला स्तनपान करतांच मस्त आनंदानें चळवळणाऱ्या बालकाच्या निःश्वासाचीच उपमा साजेल! त्या निःश्वासाइतकाच तो गंध पवित्र व आल्हादकारक वाटतो. मृग नक्षत्रांतील ती पहिली सर कोसळते व तो अनुपमेय गंध भूपृष्ठांतून उठतो त्या वेळीं लहान मोठ्या पक्ष्यांची फडफड व चिवचिव होते ती तरी किती गोड असते! व जीर्ण तृणांकुर कुरतडून शिणलेलीं गाईवांसरें अंगें भिजतांच हंबरतात तीं तरी किती गोड !

पावसाचे प्रकार अनेक आहेत, व त्या प्रत्येकाची मौज वेगवेगळी आहे. उगीच चार शितोडे पडावेत, त्या टपोऱ्या थेंबांचा घरांच्या कौलांवर व पत्र्यांवर तडतड आवाज व्हावा, व एकदम गप्प व्हावें, आणि पाऊस पडला कीं पडल्याचा नुसता भास झाला हें पहावयाचें झालें तर रस्त्यावरच्या भिजट धुळीचीच साक्ष घ्यावयाची वेळ यावी असा प्रकार कित्येक वेळां होतो. लहान मुलांच्या हंसण्याखिदळण्यांत व रडण्यांत जो अचानकपणा आणि अनिश्चय असतो त्याचीच नक्कल असला पाऊस करीत असतो. ही वळिवाची सर शहरांपेक्षां खेड्यापाड्यांत मोकळ्या मैदानावर बघावयाची खरी मजा! तेथें दृष्टीच्या टप्प्यांत खूप विस्तीर्ण प्रदेश येत असल्यामुळें मैल दीड मैल अंतरावर पडणारा पाऊसही स्पष्ट दिसतो; आणि भूगोल व खगोल सांधणारा तो अजस्र कृष्णवर्ण जलस्तंभ वेगानें आपल्याकडे सरकत येतांना व आपल्याला भिजवून पलीकडे दुसऱ्या क्षितिजापर्यंत धावून अदृश्य होतांना दिसला, कीं बाह्यांगाप्रमाणेंच अंतरंगही आनंदानें न्हाऊन निघतें. एखाद्या

बागवानानें हातांत झारी घेऊन ती सहज झरदिशीं हिरवळीवर फिरवावी तद्वत् वरुणानें गमतीनें पाण्याचा फवारा फिरविल्या-सारखें अशा वेळीं वाटतें. असली वळिवाची सर पडते ती बहुधा तिसऱ्या प्रहरीं किंवा संध्याकाळीं पडते; आणि कित्येक वेळां सूर्यप्रकाश यत्किंचितही न मंदावतां, व आकाशांत मेघपटल न दिसतां, नकळत कोठून तरी वर्षाव व्हावा अशी ती सर येते. ऐन सूर्यप्रकाशांत पडणाऱ्या असल्या पावसाला ग्राम्य भाषेंत 'नागवा पाऊस' म्हणतात, नव्हे ? हें वर्णन ग्राम्य असलें तरी अत्यंत समर्पक समजलें पाहिजे. सहस्राक्षी सूर्यासारख्या परपुरुषाची भेदक तिरपी नजर सहन करून मेघपटलाचा नेहमींचा आड-पडदाही न ठेवतां जलदेवतेनें खुशाल भूपृष्ठावर नाचावें हा प्रकार कुलस्त्रीस जरा न शोभण्यासारखाच नव्हे काय ?

पावसाच्या या प्रकाराच्या अगदीं उलट असा दुसरा एक प्रकार आहे. एखादे वेळीं आकाशांत अभ्रांचा सारखा दाट थर दिल्यासारखा दिसतो. रमणीवर रुसलेल्या वल्लभाप्रमाणें सूर्य जणुं कोठें कोंपऱ्यांत दूर बसलेला असतो, भरदुपारचा प्रहर असला तरी तिन्हीसांजांचा भास होत असतो, आणि इतकी सारी तयारी होऊनही पाऊस मात्र पडत असतो तो तांदुळाचें पीठ वाऱ्यावर उडावें व पडावें तसा. पावसाची ही भुरभुर घटकाभर खुशाल अंगावर घेतली तरी अंग भिजावयाची भीति नसते. घरांत बसलेल्या माणसाला तर असल्या पावसाची दादही लागण्याचा संभव नसतो. छपरावर किंवा पऱ्यावरही

याचा शब्द होत नाहीं. मांजराचीं अलगद पावलें कधीं चाहूल देत नाहींत म्हणतात. तितकीच निःशब्द याची चाहूल असते. हा लबाड, चोरट्या चालीचा पाऊस विनोदनिर्मितीचें उत्कृष्ट उदाहरण म्हणून समजावयास हरकत नाहीं. कारण याच्या तयारीचें अवडंबर पहावें तों ऐन प्रलयपर्जन्याला शोभेल असें; पण प्रत्यक्ष अवतार पहावा तो जसा कांहीं सुदामदेवानें आपल्या पुरचुंडींतले पोहे फुंकरून श्रीकृष्णाच्या हातावर ठेवले त्या वेळीं उडालेला कोंडाच!

मात्र, या हास्यरसानुकूल पावसांतही सौंदर्य शोधल्यास दिसण्यासारखें असतें. त्याची अलगद चालच काय कमी आल्हादकारी आहे? नाचाच्या वेळीं नर्तकीच्या पावलांतली मृदुता आपल्याला मोहित करते. गालीच्यावर सुकुमार पारिजात फुलें पसरून तीं न दुखवितां नृत्य करणाऱ्या नर्तकींच्या नवलकथा आपण ऐकल्या कीं, त्या आपल्याला कौतुकाच्या वाटतात. मग जलदेवतेच्या चरणपाताची सुकुमारता आपल्याला तितकीच सुभग आणि कौतुकास्पद कां वाटूं नये? या विरळ, हलक्या पावसाकडे मीं कितीदां तरी सारखा पहात राहतों; आणि त्याकडे सारखें पहात राहिलें, कीं आकाशांतून जणुं काय मऊ, काळसर रेशमाचे तंतु सारखे खालीं सुटून कोणा खोडकर मुलानें फुंकर घातल्यामुळें तसेच अधांतरीं तरंगत राहिले असावेत असा भास झाल्यावांचून रहात नाहीं!

पावसाचे असे किती मनोहर प्रकार सांगावेत? पहिलीं

नक्षत्रें भरपूर पडून सारी सृष्टि फलपुष्पांच्या वैभवानें भरघोस नटली म्हणजे तिच्या भेटीला येऊन तिला मनसोक्त आलिंगन देणाऱ्या पावसाचा थाट तर एकमेवाद्वितीयच म्हटला पाहिजे. अशा पावसाच्या वेळीं आगगाडींतून प्रवास करावा, किंवा त्याच्या काव्याचा खरा आस्वाद घ्यावयाचा असेल तर माथेरानच्या टेकडीची वाट चढावी. पुण्याहून मुंबईस जाणाऱ्या लोकांचा या दिवसांत मला किती हेवा वाटतो! पावसाची सारखी झडप लागलेली असली म्हणजे खिडकीबाहेर तोंड काढायची सोय नसते; पण बाहेरचें सौंदर्य डोळे भरून पाहिल्यावांचून जिवाला राहवत नाहीं. पुणें सोडल्यापासून तों निसर्गाचा कोंडमारा करणाऱ्या मुंबईची सीमा येईपर्यंत वर्षाऋतूचीं नानाविध सुंदर स्वरूपें दृग्गोचर होत असतात. तळेगांवच्या पुढें गाडी सरकल्यापासून चहूंबाजूंचा स्नानमग्न रम्य वन्य प्रदेश आणि त्या प्रदेशाच्या सीमेसीमेवर इमानी पहारेकऱ्यासारखे भर वृष्टींतही स्थिर राहिलेले डोंगर दिसूं लागतात. घाटमाथ्यावर पांचतांच पर्जन्य व वायु यांची सृष्टिदेवीचें प्रियाराधन करण्यासाठीं चाललेली चढाओढ पाहण्यांत गुंतलेले तटस्थ गिरिराज किंचित् भुंवया वक्र करून आपल्या कन्येच्या लग्नाचा सोहळा हंसतमुखानें पाहणाऱ्या पित्यासारखे वाटतात. घाटांत तर वर्षाऋतूची ऐन जवानी गर्जना करीत कड्याकड्यांवरून कोसळतांना दिसते; आणि कर्जतपासून कल्याणपर्यंतच्या सपाट भूमिभागावर गुडघाभर पाण्यांत बुडून वर डोकें करून वांकुल्या

डोलविणारे भाताचे लोंगर, वय झालें तरी रसिक वृत्तीनें उत्सव-प्रसंगीं माना डोलविणाऱ्या वृद्धांप्रमाणें वाटणारे उंच उंच ताडवृक्ष, आणि प्रेमवेड्या आईनें हृदयाशीं क्षणमात्र धरून पुन्हां खेळायला सोडलेल्या खेळकर मुलांप्रमाणें खळखळणारे लहान मोठे जलौघ, असल्या हृदयंगम दृश्यांची जिकडे पहावें तिकडे गर्दी उसळलेली दिसते!

मात्र, सौंदर्याचा हा पर्वकाल पहावयास मिळेल अशा आशेनें प्रवासास निघावें तों एखादे वेळीं पाऊस अजिबात उघडतो, आणि जबर निराशेचा तडाका मुकाट्यानें सहन करावा लागतो. जलदेवतेच्या अंगीं स्त्री-स्वभावांतला लहरीपणा अगदीं पुरा उतरलेला आहे हें अशा वेळीं पटतें. परंतु कधीं मधुर वचनांची वृष्टि करणाऱ्या तर कधीं उगीचच रुसव्याचें मनोहर सोंग करून अबोला धरणाऱ्या स्त्रीसारखी जलदेवता आहे म्हणूनच तिच्या वागण्यांत काव्य आहेसें वाटतें. पाऊस कधीं कोसळेल याचा नियम नसतो हें खरें; पण म्हणूनच त्यांत गंमत आहे. अनिश्चिति हा काव्यप्रसंगाचा आत्मा नाहीं काय?

पावसाच्या या अनिश्चितपणावरून आठवण झाली. पाऊस अनिश्चित असतो म्हणून किती गंमती होतात पहा. मी कॉलेजांत होतों तेव्हां क्रिकेटच्या मोठमोठ्या मॅचेस भर पावसाळ्यांत असावयाच्या. एखादी सुंदर मॅच ठरलेली असावयाची, आणि त्या दिवशीं सकाळीं उठून पहावें तों वरुणानें भले मोठे मोठे जलकुंभ आकाशांत हारीनें मांडून ठेवलेले दिसावयाचे!

छे, छे ! हा चांडाळ पाऊस आजचा क्रीडामहोत्सव पार बिघडविणार अशी भीति वाटावयाची. मग मन सारखी प्रार्थना करीत सुटावयाचें कीं, वरुणदेवा, दोन दिवस जरा कृपा कर आणि मग काय दंगा उडवायचा असेल तो उडव. अरे, केवढी मोठी आजची मॅच आहे ! आज नायडू, देवधर, विठ्ठल आपलीं आयुधें सरसावून येतील आणि पारशी गोलंदाजांच्या कंदुकांचीं मस्तकें तडातड उडवतील तो समरप्रसंग जरा पाहूं दे आम्हांला ! तुला कसा रे असा सुंदर खेळ पहावयाचा अगदीं नाद नाहीं ? इंद्राच्या दरबारांत क्रिकेटची आवड उत्पन्न होणार तरी कधीं ?

आणि काय आश्चर्य ? एखादे वेळीं ही आमची प्रार्थना मान्य व्हावयाची ! खरोखरच आकाशांतल्या त्या अजस्र मेघांच्या सिंहासनावर बसून वरुणदेव मोठ्या कौतुकानें जणुं काय आमची मॅच पहात बसायचा, आणि वृष्टि करायचें भानच त्याला उरायचें नाहीं !

पावसाच्या रसिकतेचें हें उदाहरण कवींची खात्री पटायला वास्तविक पुरेसें आहे. कवींचा लाडका वसंत रसिक खराच; पण वर्षाऋतु कांहीं कमी रंगेल नाहीं. आणि इतकें सांगूनही कवींना हट्ट सोडावासा वाटत नसेल, तर मी विचारतों, अहो, वसंतसेनेच्या आलिंगनाचें परमसौख्य चारुदत्तास अकल्पित मिळवून देणारा, आणि "तेचि पुरुष दैवाचे" असे धन्योद्गार त्या महाभागाच्या तोंडून वदविणारा आमचा वर्षाऋतुच ना ?

—जानुआरी, १९३१

१३

# हरवली म्हणून सांपडली !

अशा वेळीं अगदीं मनस्वी संताप येतो, नाहीं का? आणि वाटायला लागतें, कीं जगांत मुद्दामच अशा कांहीं द्वाड शक्ती लपून बसल्या आहेत, कीं ज्यांनीं माणसाची उगीचच्या उगीच खोडी काढावी आणि आपल्या गुप्त जागेवरून त्याची मौज पाहून कुत्सितपणें हंसावें! (प्रेमांतल्या माणसाला पानभर पत्र लिहावें आणि एकदम हातांतला टांक हिंदकळून त्यावर भला मोठा शाईचा डाग पडावा, किंवा कॉलेजमध्यें मिरवण्यासाठीं व मैत्रिणींची स्तुतिगर्भ चेष्टा मुद्दाम अंगावर घ्यावयासाठीं नव्या तऱ्हेची, ऐन फॅन्सी चप्पल घालून जावें आणि वाटेंत तिची पट्टी तुटावी, अशा दिसायला क्षुल्लक पण भारी तापदायक निराशा माणसाच्या वांट्याला एरवीं आल्या नसत्या! तुम्ही कांहीं म्हणा, माझी तर या खोडकर द्वाड शक्तींच्या अस्तित्वाबद्दल अगदीं पुरी खात्री आहे.) नाहीं तर त्या दिवशीं माझ्या टेबलाच्या खणाची किल्ली हरवावी याला कांहीं कारण?—

माझ्या अंगीं इतर सद्गुण असोत नसोत, व्यवस्थितपणा तरी माझ्या स्वभावांत खास आहे. (हा गुण मला कोणीं शिकविला आहे असेंही नाहीं. किंबहुना गुण किंवा अवगुण माणसाच्या ठिकाणीं शिकवणुकीनें कितपत उत्पन्न होतात याविषयीं मला शंकाच आहे. बालसंगोपन, बालशिक्षण वगैरे विषयांवर ठरीव सांच्याचे लेख लिहिणारी मंडळी या ठिकाणीं माझ्याशीं कदाचित् भांडायला उठतील, व मोठमोठे फिरंगी ग्रंथ हातीं घेऊन ते मला भेवडावतील. पण माझ्याहीजवळ मानसशास्त्र व सारासारविचार नांवांचे भक्कम काष्ठदंड आहेत ! पण तें असो. मला सांगायचें होतें येवढेंच कीं, टापटीप व व्यवस्थितपणा माझ्या अंगीं भरपूर आहे, व) त्यामुळें माझी किल्ली हरवली ती मीं कोठें तरी निष्काळजीपणानें ती टाकली म्हणून हरवली असें म्हणतां यायचें नाहीं. ती मी नेहमीं खुणेनें ठेवीत असें, व ती मला अंधारांतसुद्धां नेमकी घेतां येत असे. परंतु आज ती त्या खुणेच्या जागीं दिसेना, आजूबाजूसही सांपडेना, घरांतल्या किल्ल्यांच्या जुडग्यांतही मिळेना, साऱ्या कोटांचे व ओव्हरकोटाचेसुद्धां खिसे तपासले तरी गवसेना !

(मला तर ती अतिशय निकडीनें हवी होती. इंग्लंडला गेलेल्या एका मैत्रिणीला मला पत्र धाडायचें होतें. अगदीं अभ्यंतरांतल्या मित्रांना किंवा मैत्रिणींना पत्र पाठवायचें म्हणजे तो आपल्या भाग्याला आलेला एक रम्य विलास होय असें मी समजतों. प्रत्येक मित्रासाठीं किंवा मैत्रिणीसाठीं मीं स्वतंत्र रंगाचे,

आकाराचे आणि सुवासाचे नोटपेपर योजिलेले असतात, व त्यावरच पत्र लिहिण्याचा मी अगदीं कटाक्ष ठेवतों. हे नोटपेपर ज्या खणांत होते त्याचीच किल्ली हरवून बसली. आज शुक्रवार, विलायतचें टपाल धाडायचा अखेरचा दिवस होता. आजची डाक टळली कीं आठ दिवस थांबणें प्राप्त होतें. आधींच माझ्याकडून त्या मैत्रिणीला पत्र धाडण्यांत जरा चालढकल झाली होती. त्यांत आणखी एका आठवड्याची भर पडली, कीं तिचा माझ्यावर किती रोष होणार तें मला स्पष्ट दिसत होतें. कांहीं स्त्रिया अत्यंत प्रेमळ असतात; पण त्यांच्या त्या प्रेमांतही विलक्षण तामसीपणा असतो, व त्यांची प्रीति संभाळतांना भारी दक्षता ठेवावी लागते. कांठोकांठ भरलेलें भांडें डोक्यावर घेऊन तारेवर चालणें जितकें कठीण तितकेंच त्यांच्या प्रीतींत राहणें कठीण. बोलण्याचालण्यांत आपला थोडासा तोल गेला कीं, मस्तकावर धारण केलेली त्यांची प्रीति सांडायला उशीर नाहीं लागायचा!

सारांश, आज पत्र लिहिणें तर अगदीं अगत्याचें होतें, ठरीव नोटपेपराखेरीज पत्र लिहावयास मी तयार नव्हतों, आणि ज्या खणांत नोटपेपर होते त्याची किल्ली तर कांहीं केल्या सांपडेना! ती आपल्या ठरीव जागीं नव्हती, आणि मीं ती दुसऱ्या कोठें ठेवल्याचेंही मला कांहीं केल्या आठवेना. एखादी गोष्ट आठवेनाशी झाली, कीं तिच्या आठवणीच्या खणपटीस बसायच्या ऐवजीं जरा वेळ तिचा विचार अजिबात मनावेगळा करावा म्हणजे आपोआप ती एकदम आठवते असें कोठेंसें वाचलें होतें,

म्हणून तसा प्रयोग करून पाहिला; परंतु किल्लीचा विचार थांबवावयाच्या माझ्या प्रयत्नानें तो विचार उलट अधिकच डिंवचला जाऊं लागला.(शास्त्रीय सिद्धान्त पुस्तकांतच शोभतात, व्यवहारांत वापरूं नये म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं.)

आतां काय करावें ? कुलूप फोडावें काय ?—त्या अत्याचारी मोहाला मी बळी पडलों असतों; पण तितक्यांत मला आठवलें कीं, जी किल्ली सांपडत नव्हती तिची एक जोडकिल्ली टेबल घेतलें त्या वेळीं मला मिळाली होती. माझ्या मधल्या माडींत भिंतीच्या अंगचें एक लहानसें बंदिस्त फडताळ होतें त्यांत मीं ती जोड किल्ली टाकली असावी असेंही मला खात्रीनें वाटलें. कारण त्या फडताळाचा मी एखाद्या कोठीसारखा उपयोग करीत असें. माझ्या लिहावयाच्या टेबलांतल्या खणांत ठेवण्यासारखें जें जें नसे तें तें मी या फडताळांत टाकून देई. केव्हां तरी कांहीं निमित्तानें लागणारें असें जें जें मला वाटे तें तें चटकन् या फडताळांत ठेवायची माझ्या विद्यार्थिदशेपासून मला संवय झाली होती. माझ्या वाचण्याच्या, ऐकण्याच्या किंवा विचाराच्या ओघांत कांहीं चांगलें सांपडलें, कीं एका टांचणबुकांत त्याची नोंद करावयाची जशी मला संवय झाली होती तशीच ही संवय होती. कांहीं चांगलें वाचलें, ऐकलें किंवा सुचलें, कीं तें त्या बुकांत लिहिल्याशिवाय मला चैन पडत नसे. आपण कधीं हें बुक उघडून पहातही नाहीं, मग हें टांचण करण्यांत शोभा ती काय असें प्रत्येक वेळीं माझ्या मनांत येई. पण तें क्षणभरच;

आणि काय लिहावयाचें तें मी लिहून टाकीत असें. तद्वतच त्या फडताळांत कांहीं ठेवावयाला लागलों, कीं मला वाटे, काय येथें ठेवून उपयोग?–आपण कधीं यांतली वस्तु मुद्दाम शोधून काढून वापरणार आहोंत थोडीच! पण एकीकडे असें मनांत येई, तर दुसरीकडे जिवाला राहवत नसे, व काय ठेवायचें तें फडताळ उघडून त्यांत टाकून दिलें म्हणजेच मला बरें वाटे!

म्हणून मी उठलों आणि तें फडताळ उघडून पाहूं लागलों. पण बोलूनचालून मन मानेल तशा टाकलेल्या वस्तूंची जागा ती! तेथें मला ताबडतोब हवी ती किल्ली थोडीच दृष्टीस पडणार? ती झट्कन् दिसावी म्हणून अस्ताव्यस्त पडलेल्या त्या साऱ्या वस्तू मी अधीरतेनें इकडल्या तिकडे व तिकडल्या इकडे करूं लागलों. किती नाना प्रकारच्या वस्तू होत्या त्या! जुन्या चांदीच्या दौती, जुने कंगवे, उन्हांत घालायचे चष्मे, शर्टचीं बटणें, फाउन्टन पेनच्या पोकळ नळ्या, कॅलेंडरवरचीं भडक रंगांतलीं चित्रें, लग्नमुंजींच्या निमंत्रणांचीं सोनेरी शाईत छापलेलीं जाड कार्डें, कंपासपेटींतील चारदोन सुटीं उपकरणें–अशा असंख्य वस्तूंचा गोंधळ त्या जागीं झाला होता! व प्रथम जरी मीं निर्विकार मनानें त्या उपसल्या व चाळवल्या तरी हळुहळू त्यांतल्या प्रत्येक वस्तूशीं निगडित झालेली आयुष्यांतल्या त्या त्या प्रसंगाची व वृत्तीची आठवण मनांत उभी राहून माझ्या अंतःकरणांतही अनेक भावनांचा गोंधळ दाटल्यासारखें मला वाटलें!

त्या पसाऱ्यांत दोन अलगुजें पडलीं होतीं. (आज) जवळ जवळ पंधरा वर्षांत मी त्यांस शिवलों नव्हतों. (या वयांत मी अलगुज वाजवीत बसलों तर लोक हंसतील. मी लोकांच्या हंसण्याला किंवा टीकेला भीक घालणारा नाहीं. पण माझी संगीताची आवड व समजूतही आतां अशी राहिली नाहीं, कीं अलगुज वाजविण्यांत माझें मन रमावें.) पण तीं अलगुजें मीं घेतलीं तेव्हां तीं मला किती प्यार होतीं! (संगीतसुंदरीची व माझी पहिली जानपछान त्यांनींच करून दिली. माझी वृत्ति त्या वेळींही अतिशय संगीतलुब्ध होती; पण वडिलांचा धाक व विद्यार्थ्यांची मर्यादा संभाळून मला जास्तींत जास्त धीटपणा करतां येण्यासारखा होता तो येवढाच कीं, दोन रुपयांत मिळणारीं विलायती अलगुजें आणून तीं वाजवावीं. आणि त्या टीचभर बांसऱ्यांनीं त्या काळीं माझ्या जीवनांत कितीदां तरी उन्मत्त आनंद ओतला होता. (माझ्याबरोबरच्या वसतिगृहांतल्या विद्यार्थ्यांच्या मतें मी बांसरी चांगली वाजवीत असें, आणि—हाय रे, नवयौवनांतला तो गमतीचा आत्मविश्वास!—मलाही वाटे मला चांगलें वाजवितां येतें. म्हणून) कधीं खेळ आटपल्यावर तिन्हीसांजा, तर कधीं जेवण झाल्यावर रात्रीच्या प्रहरीं चांदण्यांत आम्ही टेंकडीवर जात असूं, व मी तेथें बांसरीवर जें जें येत होतें तें तें वाजवीत असें. एकदां आम्ही (नोव्हेंबरमध्यें परीक्षेसाठीं) मुंबईस गेलों. परत येतांना मुंबईहून पहांटे चारला निघणारी एक गाडी त्या वेळीं असे. त्या गाडीनें निघालों. तेव्हां गाडी

सुटल्यापासून मित्रांच्या आग्रहावरून बांसरी वाजवावयास मी सुरुवात केली,(व मधून गप्पा व मधून माझें एक गीत असा क्रम किती तरी वेळ चालू होता.) गाडी सारे बोगदे ओलांडून ऐन घाटमाथ्यावर चढली तेव्हां एकीकडे मोठ्या उन्मादानें मी बांसरींतून गीताच्या स्वरमाला काढीत होतों, व एकीकडे साऱ्या दऱ्याखोऱ्या आणि पर्वतावरची नेहमीं दिसणारी वृक्षराजी लुप्त करून दशदिशा व्याप्त करणाऱ्या धुक्याच्या अफाट, तरंगत्या समुद्राची अरुणोदयाच्या प्रकाशानें उजळलेली शोभा मीं नेत्रांनीं लुटीत होतों. त्या घटकेला मुग्ध आनंदाचे जे शहारे माझ्या अंगभर उठले त्यांचें शब्दांनीं वर्णन करूं पाहणें व्यर्थ होय !—आणि गतकालांतल्या अशा किती तरी आनंदाच्या घटका तीं अलगुजें पाहून मला आज या वेळीं आठवल्या. तीं मीं हातीं घेतलीं, कांहीं वेळ त्यांकडे पहात राहून तशींच धरलीं, व मग बाजूस ठेवलीं.

तेथें चार पांच चांदीचीं व सोन्याचीं पदकेंही पडलीं होतीं. त्यांतलीं दोन मला (कॉलेजांत असतांना) वक्तृत्वनैपुण्याबद्दल मिळालीं होतीं. त्या वेळीं मी काय बोललों असेन तें आज आठवणें शक्य नव्हतें हेंच बरें. कारण तें आठवतें तर माझें मलाच हंसूं आलें असतें. (खचित मीं एखाद्या उद्धटासारखी कांहींतरी वाचाळपंचविशी केली असेल, आणि त्या पारितोषिकांवरून माझ्या नैपुण्यापेक्षां देणाऱ्याच्या अंतःकरणांतल्या कौतुकाचाच बोध लोकांना झाला असेल. परंतु तीं पदकें मला जेव्हां

मिळालीं तेव्हां त्यांनीं माझ्या हृदयांतल्या केवढ्या जबरदस्त महत्त्वाकांक्षेचें समाधान केलें होतें, व मला केवढा हर्ष प्राप्त करून दिला होता!) आज तीं सुवर्णपदकें जुनीं होऊन विटलीं होतीं. पण जेव्हां तीं मिळावीं म्हणून मी झटलों तेव्हां (माझ्या वांछेमुळें अधिकच वाढलेली) त्यांची कान्ति किती अलौकिक होती? त्यांच्या प्राप्तीसाठीं केलेल्या श्रमांत ईर्षा, तळमळ, विश्वास, भीति, आशा, शंका, यांच्या विचित्र संमिश्रणाचें केवढें सुख मीं अनुभवलें होतें? (भाषण मनाशीं जुळवून अगर कागदावर टिपून तें शेवटीं सफाईनें यावें म्हणून त्यांतलीं संकेतस्थळें मीं मनांत किती जपून सांठविलीं होतीं) कधीं कधीं भरसभेंत उभें राहिल्याची कल्पना करून, जुळविलेलें भाषण कोठें तरी एकान्तांत करीत त्याचा सभेवर होणारा परिणाम माझा मींच अजमाविला होता. त्या वेळीं वक्ता व श्रोता या दोन्ही भूमिका मीं एकदम केल्या होत्या, (आणि वक्त्याचा अभिनिवेश आणि श्रोत्याची तन्मयता हीं एकाच वेळीं अनुभवतांना माझें चित्त थरारलें होतें. सभेंत करावयाच्या भाषणाची मनाशीं सतत जुळवणी व उजळणी करीत असूनही कसलीच तयारी न करतां बोलण्याची संपादणी मीं कितीदां तरी केली होती, व त्या त्या वेळीं, साऱ्या जगापासून कांहींतरी गुपित लपविण्याचा जो एक सूक्ष्म आनंद असतो त्याचा मनसोक्त प्रत्यय मीं घेतला होता. आणि) कधीं कधीं प्रातःकाळच्या अगदीं पहिल्या किंवा संध्या-काळच्या अगदीं सरत्या घटकेची शांतता व एकान्त साधून,

उंचवट्याच्या उघड्या जागीं जाऊन, सुराची उंची आणि वाणीची स्पष्टता साध्य करण्यासाठीं खड्या आवाजांत मी ओरडलों होतों. मोकाट माळावरच्या त्या बिनप्रेक्षकांच्या भाषणांतला आल्हाद और असे. डोंगरावरच्या शिला, वृक्ष व पक्षी आणि रानवारा किती तन्मयतेनें माझें भाषण ऐकत! आणि कोणाची भीडमुर्वत न ठेवतां आपल्याच रंगांत खळाळत वाहणाऱ्या जलौघाच्या वृत्तीनें त्या ठिकाणीं उंच सुरांत बोलतां बोलतां, आपणही या सृष्टीचे एकरूप अंशच आहोंत असा विलक्षण सुखाचा भास मला कित्येक वेळां होई! डोंगरावर जाऊन त्या सुखाचा अनुभव मला आतां कोठला घेतां येणार?—तीं चांदीसोन्याचीं पदकें पाहून निदान त्या सुखाची गोड आठवण तरी मला ताजी करून घेतां येण्यासारखी होती; व तसें मनसोक्त केल्यावरच मीं तीं हातचीं खालीं ठेवलीं.)

फडताळांतल्या त्या पसाऱ्यांत एक कुत्र्याच्या गळ्यांत घालायचा धातूचा पट्टाही होता. माझी 'जाई' नांवाची एक लाडकी कुत्री होती तिचा तो होता. मी बारा तेरा वर्षांचा होतों तेव्हां एका वैदूजवळून एका भाकरीवर विकत घेऊन मीं ती बाळगली होती. माझ्या आईबापांना किंवा घरांतल्या कोणाही वडील माणसांना ती आवडत नसे; पण माझ्या मतें ती फार गोजिरवाणी आणि हुषार होती. घरांतलीं माणसें तिला घाण समजत; पण मला ती अस्वच्छ कधींच वाटली नाहीं. मीं तिला अंगाखांद्यावर घेत असें, तिचे पटापट मुके घेत असें, आणि तिला

पांघरुणांत घेतल्याशिवाय दूर निजणें माझ्या जिवावर येई. मी शाळेंतून परत येतांच शेपटी हालवून व माझ्या अंगावर उड्या घेऊन ती आपला जीव कासावीस करी. (एकदां गणिताच्या मास्तरांनीं मला छडी मारली होती, व छडीचा तो मला पहिलाच अनुभव असल्यानें घरीं आलों तों हातावर अजून तें दुःख आहेसें मला वाटत होतें, व मन तर त्या अपमानानें जळत होतें. पण घरीं येतांच जाईनें आपल्या भाबड्या जिभेनें जेव्हां माझा तळहात आधाशासारखा चाटला तेव्हां माझें सारें मानसिक व शारीरिक शल्य पार नाहींसें झालें.) जाईला दिल्याशिवाय मी कधीं कांहीं खाल्लें नाहीं, कीं प्यायलों नाहीं; व त्याबद्दल वडील-धाऱ्यांनीं रागाचीं कितीही बोलणीं केलीं तरी तीं मला अवघड वाटलीं नाहींत. पण जाई फार दिवस मला लाभली नाहीं. (पहिल्याच खेपेस वीत असतांना) तिला काय झालें कोणास ठाऊक, तिचें प्राणोत्क्रमण झालें. शेवटच्या क्षणीं तिनें पाण्यानें भरलेल्या डोळ्यांनीं माझ्याकडे जी केविलवाणी दृष्टि टाकली ती मी जन्मोजन्मीं विसरणार नाहीं. तिचें शव नेलें तेव्हां मीं रडून आकान्त केला, व तिची एक आठवण म्हणून तिच्या गळ्यांतला पट्टा काढून ठेवला. आज तो पट्टा हातीं घेतांच या साऱ्या आठवणी माझ्या मनांत उचंबळून आल्या आणि नवल असें कीं, त्या इमानी, मुक्या जनावराच्या त्या अखेरच्या शोकपूर्ण कटा-क्षाची आठवणही मला सुखाचीच झाली. एरात दुःखाच्या आठ-वणीपासून सुखाचाच अनुभवं मिळतो हें कांहीं खोटें नव्हे.

त्या फडताळांतल्या किती वस्तूंनीं माझ्या आयुष्यांतले सुख-दुःखांचे किती प्रसंग माझ्या दृष्टीपुढें उभे केले तें किती सांगावें? जणुं माझ्या चरित्राचें एक पुस्तकच माझ्या हातीं आलें होतें, व त्यांतील प्रकरणामागून प्रकरणें मी वाचीत राहिलों होतों. तीं प्रकरणें वाचतांना मला जो विलक्षण आनंद झाला त्याला दुसरी कसली उपमाच देतां येणार नाहीं. माझी टेबलाच्या खणाची किल्ली हरवली खरी; पण या केवढ्या सौख्यागाराची किल्ली मला सांपडली! किंबहुना, ती हरवली म्हणूनच ही सांपडली!

—जुलाय, १९३१

१४

# एक रात्र आणि पहांट

पुस्तकांच्या तीन जाती आहेत. कांहीं अशीं असतात कीं, तीं भरेकन् वाचून टाकावीं. आपण गाडी थांबल्या वेळांत स्टेशनवरचें आइसक्रीम नाहीं का संपवीत ? तशीं. कांहीं पुस्तकें अशीं असतात कीं, उगीच चाळावीं आणि ठेवून द्यावीं. भरल्या पोटावर आपल्या पुढें कोणीं बशीभर चिवडा ठेवला म्हणजे त्यांतल्या दोन काजूबिया खाऊन कशी ती बशी आपण बाजूला सारतों ना? त्याप्रमाणें. पण कांहीं पुस्तकें मात्र आपल्या मनाला अत्यंत आवश्यक अन्न देणारीं असतात, व तीं त्या अन्नाप्रमाणें सावकाश चघळून पचविलीं पाहिजेत.

आणखी किती तरी निरनिराळ्या दृष्टींनीं पुस्तकांचें वर्गीकरण करतां येईल. उदाहरणार्थ, कांहीं पुस्तकें अशीं असतात, कीं तीं वाचूं लागलें, कीं मनांतल्या मनांत वाचण्याऐवजीं आवेशानें मोठ्यानें कोणाला तरी वाचून दाखविल्याप्रमाणें वाचावीं असें वाटल्यावांचून राहात नाहीं. उलट कांहीं पुस्तकांचें असें असतें,

कीं एखाद्या प्रेमांतल्या माणसाला एकांतांत घेऊन त्याच्याशीं कदाचित् कांहींच न बोलतां नुसतें त्याच्या सहवासांत बसल्याचा आनंद आपण घेतों, तद्वत् त्यांचा आनंद घ्यावा असें वाटतें. त्याप्रमाणें असेंही म्हणतां येईल, कीं कांहीं पुस्तकांमुळें मनांत ताबडतोब प्रसन्नता उत्पन्न होते, पण ती प्रसन्नता टिकतेही अल्प कालच; तर कांहीं पुस्तकांचें असें असतें कीं, त्यांतील खऱ्या आनंदाचा प्रत्यय यायला उशीर लागतो, पण तो एकदां आला, कीं दीर्घ काल कायम राहतो. इतकेंच नव्हे तर जसजसा काळ लोटेल तसतसा त्याचा अंमल चढतच जातो. शीघ्रपरिणामी व दीर्घपरिणामी अशीं दोन प्रकारचीं मद्यासवें असतात, तशाच पुस्तकांच्याही दोन तऱ्हा आहेत म्हणा ना !

पुस्तकांचें आणखी एक वर्गीकरण आहे. आपल्या संगीत-शास्त्रांत एकंदर रागांचें जसें अमुक प्रहरांत रंजकत्व पावणारे अमुक असें वर्गीकरण केलें आहे, तसेंच पुस्तकांचेंही कां करूं नये ? सकाळच्या प्रहरीं कादंबरी हाताशीं असली तरी ती वाचायला व्यावीशी मला तरी निदान वाटत नाहीं. त्या वेळीं तिची भूक अंतःकरणाला नसते. ती वाचली तर टाकावीशी वाटणार नाहीं हें जरी खरें, तरी तिचा खरा स्वाद मिळालासा वाटणार नाहीं हही खरें. त्या घटकेला कांहीं तरी शास्त्रीय, तात्त्विक, गंभीर विषय वाचावा अशी माझ्या मनाची हौस असते. संध्याकाळच्या प्रहरीं मात्र कादंबरीइतकी कशांतच मौज वाटत नाहीं. रात्रीं अंथरुणावर पडल्यापडल्या वाचावीं अशीं कांहीं पुस्तकें

असतात कीं नाहीं हें मला निश्चयानें सांगतां येत नाहीं. त्या घटकेला वर्ज्य मानावीं अशीं कांहीं पुस्तकें असतात कीं नाहीं हेंही कालपर्यंत मला सांगतां आलें नसतें; परंतु—

परवां काय झालें, लायब्ररींतून आणलेलें एक पुस्तक बरेच दिवस मजजवळ तसेंच पडून राहिलें होतें, व तें दुसऱ्या दिवशीं परत करायलाच पाहिजे होतें म्हणून निजतांना मीं तें वाचायला घेतलें. दिवस उन्हाळ्याच्या अखेरीचे होते, व ऊष्मा अतिशय होत होता. मीं गच्चीवर पथारी टाकली होती. अंधारी रात्र असल्यामुळें वर आभाळांत तारकापुंजांची शोभा दाटली होती. मंगळ अगदीं मध्यावर आला होता. त्याच्या आजूबाजूस दोन-चार राशींच्या तारका चमचमत होत्या. उजव्या बाजूनें आकाश-गंगेचा दुधरंगी पट्टा गेलेला दिसत होता, आणि बाकी जिकडे तिकडे लकलकणाऱ्या तारकांची गर्दी उसळली होती. अंथरुणा-वर पडल्यापडल्या मी कांहीं वेळ त्या एकंदर दृश्याकडे पहात राहिलों तसें माझें मन विस्मयानें म्हणालें, "या अफाट विश्वांत मानवी जीविताची कांहीं गणना आहे कां ?—कीं उगीचच आमच्या सुखदु:खांचें वृथा महत्त्व वाढवून आम्ही मानव धांपा टाकतों, धडपडतों, हंसतो आणि रडतों ?"—

नवल असें कीं, उशागतचें पुस्तक घेऊन मी वाचूं लागलों, तों त्यांत नेमकें माझ्या प्रश्नाचेंच उत्तर सांपडूं लागलें. जणुं कांहीं त्या पुस्तककर्त्यानें माझे आत्मगत विचार ऐकले व पुढें होऊन तो म्हणाला, " मी सांगतों तुम्हांला. "

त्या पुस्तकाच्या पहिल्या प्रकरणाचा मथितार्थ असा होता कीं, रात्रीं उघड्यावर निजलें कीं, जे असंख्य तारकापुंज अंतरिक्षांत आपल्या नजीकच असल्यासारखे वाटतात ते वास्तविक आपल्यापासून कोट्यानुकोटी मैलांच्या अंतरावर आहेत. या तारकापुंजांतील आपल्यापासून सगळ्यांत कमी अंतरावर जे आहेत त्यांचा प्रकाश आपल्यापर्यंत पोचायला पांच कोटी वर्षे लागतात. साऱ्या जगांत मोठ्यांत मोठी जी दुर्बीण आहे तिच्या साहाय्यानें सुमारें वीस लाख तारकापुंजांचे फोटो घेतां येतात. बाकी उरलेले असंख्य तारकापुंज दुर्बिणीच्या कक्षेंत येत नाहींत.

प्रत्येक तारकापुंजांत अब्जावधि तारका असतात. या तारकांपैकीं थोड्याशा अशा आहेत कीं, त्यांचा आकार आपल्या पृथ्वीएवढाच आहे असें म्हणतां येईल; पण बाकीच्या तारकांपैकीं प्रत्येकीचा आकार एवढा मोठा आहे कीं, आपल्या पृथ्वीसारख्या लक्षावधि पृथ्वी तींत सहज मावतील. अशा असंख्य अजस्र तारका अंतरिक्षांत संचार करीत आहेत, व त्या किती आहेत विचाराल तर साता समुद्रांच्या तीरावरची वाळू एकत्र केली व त्या वाळूच्या कणांची मोजणी केली तर त्या संख्येच्या मापानेंच उत्तर द्यावें लागेल.

हें पाहतां असें वाटेल कीं, महात्माजींच्या व्याख्यानाच्या वेळीं आझाद मैदानावर जशी लोकांची खेंचाखेंच होते तशी अंतरिक्षांत तारकांची नुसती खेंचाखेंच उडाली असेल. पण छे, छे ! उलट खरी स्थिति अशी आहे, कीं एका तारकेपासून

हांकेच्या अंतरावर दुसरी क्वचितच येते. दोन तारकांची एकमेकीला नमस्कार चमत्कार करण्याइतकी जवळून भेट होणें विरळा. एखादा महासागर असावा, आणि त्याच्या पृष्ठावर अनेक गलबतें एकाच वेळीं चाललीं असलीं तरी एकाची दुसऱ्याशीं गांठ क्वचितच पडावी, त्याप्रमाणें अंतरिक्ष कल्पनातीत अफाट आहे व त्यांत संचरणारी एकेक तारका एखाद्या एकाकी प्रवाशाप्रमाणें आपल्या मार्गानें चाललेली आहे.

पण दोन तारकांच्या भेटीचा अपवादात्मक प्रकार सुमारें दोन अब्ज वर्षांपूर्वीं घडून आला. ज्याला आपण सूर्य म्हणतों तो वास्तविक असंख्य तारकांपैकीं एक आहे. दुसरी एक तारका अंतरिक्षांतून भ्रमण करीत करीत आपल्या सूर्याच्या अगदीं जवळ आली. यामुळें असें झालें कीं, चंद्राच्या आकर्षणामुळें पृथ्वीच्या कडेवरच्या पाण्याला उचंबळून जशी भरती येते तशी त्या जवळ आलेल्या तारकेच्या जबरदस्त आकर्षणानें सूर्याच्या बहिःपृष्ठावर एक लाट उसळली. ही लाट इतकी अजस्र होती कीं, जणुं सूर्याच्या कडेचा हजारों हिमालयांच्या मापाचा एक तुकडाच्या तुकडा फुगल्यासारखा झाला, व हा तुकडा अखेर ताड्दिशीं सूर्यापासून ओरबाडला जाऊन त्याचीं अनेक शकलें झालीं आणि तीं सारीं सूर्याभोंवतीं भ्रमण करूं लागलीं. ह्या शकलांपैकीं एक शकल म्हणजेच आपली पृथ्वी होय !

पृथ्वीचा जन्म हा असा झाला. असा म्हणजे केवळ यदृच्छेनें— अकस्मात् एक तारका सूर्याजवळ आल्यामुळें. ती तारका सूर्यास

भेटली नसती तर पृथ्वी कदाचित् अस्तित्वांतही आली नसती. आणि पृथ्वीचा जन्म जसा योगायोगाच्याच बळावर तसाच पृथ्वीवर मानव प्राण्याचा अवतार झाला तोही योगायोगानेंच. सूर्यापासून फुटून भ्रमण करूं लागल्यावर पृथ्वीची मूळची ऊष्णता कमी कमी होत गेली, व शेवटीं ती पुरी थंड झाल्यावर तिच्यावर जीवसृष्टीचा जन्म झाला. तो कसा, केव्हां आणि कां झाला तें अजून कोणासही कळलेलें नाहीं. प्रथम पृथ्वीवर अशा प्रकारचे जीव उत्पन्न झाले कीं, प्रजोत्पादन व मृत्यु या दोनच क्रिया त्यांच्या आयुष्यांत घडत. परंतु जीवसृष्टीचें स्वरूप हळु-हळू अधिकाधिक गुंतागुंतीचें होत गेलें, आणि शेवटीं शरीरधर्मा-पेक्षां वासना, भावना, तर्क, आशा, आकांक्षा या मनोधर्मांचाच भाग ज्यांच्या चरित्रक्रमांत अधिक असतो अशा मनुष्यप्राण्यांची जाति पृथ्वीवर वावरूं लागली.

म्हणजे विश्वाच्या या जगड्व्याळ, प्रचंड, अफाट व्यापारांत मानवी जीवित ही अत्यंत क्षुल्लक बाब आहे. प्रचंड जहाजाच्या अंगावर माशीची थुंकी पडावी, किंवा हिमालयावर गुलाबाच्या फुलांतले केसर उडून एक कण शिखरावर चिकटावा तद्वत् या पृथ्वीवर मानवी जीविताचें आहे. त्या जीविताची विश्वाला कांहींच क्षिति नाहीं. तें उद्भवावें असा विश्वाचा उद्देश दिसत नाहीं. तें नष्ट झालें तरी विश्वाला त्याची दादही असणार नाहीं !

आणि अखेर तें नष्ट होणार, याबद्दलही संशयाला जागा दिसत नाहीं. कसें तें पहा. पृथ्वीवरच्या जीवसृष्टीचा प्राण

प्रकाश व ऊष्णता यांच्या कांहीं एका विशिष्ट प्रमाणावर अवलंबून आहे. या नियमित प्रमाणांतली ऊष्णता व प्रकाश सध्यां सूर्यापासून मिळत आहे म्हणून पृथ्वीवर जीवसृष्टि आहे. या प्रकाशोष्णतेच्या प्रमाणांत रेंसभर जरी अधिक उण्या बाजूनें चलबिचल झाली तरी जीवसृष्टि कासावीस व्हायला लागेल. सूर्याच्या ऊष्णतेचा ठेवा साहजिकपणेंच कमी होत आहे, व अर्थातच पृथ्वीला प्रकाशाचा व उष्णतेचा जो पुरवठा सूर्याकडून होत आहे तो उत्तरोत्तर घटत जाणार. आजच्याइतकीच ऊष्णता व प्रकाश सूर्याकडून मिळावा यासाठीं पृथ्वीनें सूर्याच्या अधिक जवळ जवळ सारखें सरकत राहिलें पाहिजे. परंतु पृथ्वीला खेंचण्याची सूर्याची शक्ति आणि अंतरिक्षांतील इतर अगणित तारकांचें पृथ्वीवर घडणारें गुरुत्वाकर्षण यांत सूर्य हार खाणार, व पृथ्वी हलके हलके सूर्यापासून दूर दूर जाणार यांत शंका नाहीं. म्हणजे असा एक काळ येणार कीं, पृथ्वी अंतरिक्षाच्या भयंकर गारठ्यांत एकटीच भटकूं लागणार, व असें झालें म्हणजे पृथ्वीवरचा प्राणाचा बुडबुडा जसा अकस्मात् उद्भवला तसाच अकस्मात् फुटून जाणार !

येथें पुस्तकाचें पहिलें प्रकरण संपलें, व दुसरें वाचावयास सुरुवात करण्याची माझी इच्छा नव्हती म्हणून मीं पुस्तक मिटून व बटन दाबून उशागताचा दिवा घालवून तसाच उताणा पडलों. पण झोंप लागेना. जें वाचलें त्यानें माझें अंतःकरण भारी अस्वस्थ करून टाकलें होतें.

घटकेपूर्वी ज्या असंख्य तारका पाहून माझ्या चित्ताला अपूर्व आनंद वाटला होता त्याकडे नजर वर करून पाहण्याचा मला धीर होईना. त्या वेळीं मला त्यांची शोभा मनोहर वाटली होती. आतां त्यांच्या ठिकाणीं शोभेऐवजीं विक्राळपणा आहेसें मला वाटूं लागलें. जणुं त्या सर्व तारका तिरस्कारानें हंसत आहेतसा मला भास होऊं लागला. मानवी जीवितांतला इत्यर्थ काय ?—तर चुकून अकस्मात् उगम पावायचें, सागरतीरावरच्या रजःकणाचा सहस्रांश शोभेल असल्या या पृथ्वीला चिकटून विश्वाच्या अनंत अंतराळांत क्षणभर लोंबकळायचें, आणि अखेर गारठून नष्ट व्हावयाचें ! मानवी उद्योग, शोध, पराक्रम, विद्या, कला, राज्यें, साम्राज्यें—सगळ्यांची मिळून एकंदर विश्वाच्या पसाऱ्यांत बुडबुड्यायेवढीही क्षिति नाहीं ! मानवी जीवित पार नष्ट झालें तरी जणुं तें कधीं उद्भवलेंच नव्हतें अशा प्रकारें विश्वाची प्रचंड प्रक्रिया चालूच राहील !

हे विचार माझ्या अंतःकरणाला अत्यंत तापदायक झाले.

संध्याकाळींच मराठी रंगभूमीच्या भवितव्याविषयीं मीं एका मित्राशीं खडजंगी वाद केला होता. तो आठवला व मला वाटलें, विश्वाच्या व्यापारांत अखिल खंडचतुष्टयाची व अखिल मानवी जीविताची जेथें खिसगणति नाहीं तेथें मराठी रंगभूमीचा तो काय पाड, आणि तिच्या भवितव्याविषयीं मीं मारे शिरा ताणून तें कसलें बोलावें ? मी स्वतःसाठीं एक नवा बंगला बांधीत होतों व तो पावसाळा लागायच्या आंत पुरा व्हावा

असा माझा अट्टाहास होता, हें मनांत येऊन विचार आला, कसला बंगला आणि कसला हट्ट !—या प्रचंड विश्वांत त्याची गणना कोठें ? माझी नवी कादंबरी दिवाळीला तयार होईल कीं नाहीं अशी मारे फिकीर करावयाची, त्यांत कांहीं अर्थ ? अमक्याशीं वैर धरावयाचें तमक्याशीं मैत्री ठेवायची, अमुक शिकावयाचें तमुक साधावयाचें, याला शरण आणावयाचें त्याला अंकित करावयाचें, आशा उराशीं धरावयाच्या निराशा सहन करायच्या, महात्त्वाकांक्षा बाळगायची, प्रौढी मिरवायची, पराक्रम सांगायचे, उपदेश करायचे—क्षुद्रांचे किती क्षुद्र चाळे हे सारे ! परार्ध कोटी तारकापुंज सहज उदरांत वागविणाऱ्या विश्वाला त्यांची कधीं दादही नव्हती, आणि असणार नाहीं !

या व अशा विचारानें माझें मन अतिशय कष्टी आणि भयभीत झालें. तर्कवितर्कांच्या काहुरानें झोंप येईलसें वाटेना. कोठून निजतांना तें पुस्तक वाचायला घेतलें असें झालें. असलीं पुस्तकें निजायच्या वेळीं कधीं वाचूं नयेत असें मीं मनाशीं ठरविलें. लहानपणीं भूत-पिशाच्चांच्या, राक्षसांच्या किंवा जादू-टोण्याच्या गोष्टी वाचीत रात्रीं पडूं नये असें माझे वडील मला कटाक्षानें सांगत. तसलें एखादें पुस्तक रात्रीं माझ्या हातीं दिसलें तर ते काढून घेत. त्यामुळें रेनॉल्ड्सच्या साऱ्या अद्भुत कादंबऱ्या रात्रीं वाचायच्या म्हणजे दुसऱ्या कोठल्या तरी पुस्तकांत लपवून मला वाचाव्या लागत, आणि दिवसां उघडपणीं त्या वाचण्याची सोय नसल्यामुळें मीं त्या साऱ्या तशाच लपून छपूनच

वाचून काढल्या होत्या. त्या कादंबऱ्या किंवा तसलीं इतर पुस्तकें वाचलीं, कीं घटकाभर माझ्या मनास खरोखरच एक प्रकारची विलक्षण अस्वस्थता येई आणि झोंप अशक्य होऊन बसे. यासाठींच माझे वडील असल्या पुस्तकांस मनाई करीत असावे. परंतु राक्षसांच्या व जादूटोण्याच्या त्या पुस्तकांतल्या कल्पित चमत्कारांच्या वाचनानें उद्भवणारी भयचकित अवस्था कांहींच नव्हे अशी विलक्षण प्रबळ आणि क्लेशकारक भीति, असंतोष व निराशा उशागती टाकलेल्या त्या पुस्तकांतल्या खऱ्या, शास्त्रशुद्ध मजकुरानें परवां माझ्या अंतःकरणांत निर्माण केली. निजायच्या वेळीं वाचण्यास असलीं पुस्तकें अगदीं नालायक होत असें मला वाटूं लागलें. पुस्तकांच्या वर्गीकरणांत अमुक प्रहरीं अमुक जातींचीं पुस्तकें वर्ज्य मानावीं असा नियम घातला पाहिजे असें मीं ठरविलें.

माझा डोळा केव्हां व किती वेळ लागला तें सांगतां येणार नाहीं. परंतु मी ज्या वेळीं जागा झालों त्या वेळीं अरुणकाळची विनयशील वायुलहरी माझ्या अंगावरून वाहत होती. पलीकडच्या वाड्यांत असलेल्या आम्रबकुलवृक्षांचे सुगंधी श्वासोच्छ्वास माझ्याभोंवतीं दरवळले होते, त्या वृक्षांवरच्या पक्ष्यांनीं केलेला चिवचिवाट हवेंत उठत होता, नजीकच्या सार्वजनिक हौदावर स्नानाला आलेल्या कोणा तरी माणसानें खड्या आवाजांत गंगा-स्तोत्राचा पाठ चालविला होता त्याचे स्पष्ट, रसाळ, प्रासादिक संस्कृत शब्द मला श्रुतिमनोहर वाटले, तुळशीबागेच्या राममंदिरांत

नगाऱ्याची टिपरी खणखणत होती आणि सनईतून भैरवाची सुरावट बाहेर पडत होती ती ऐकतांच तर माझ्या सर्वांगावर रोमांच उभे राहिले! आनंद, उल्हास, आशा, निःशंकपणा यांचे झरेच्या झरे आंत अंतःकरणांत कोठें तरी फुटून त्यांनीं माझा जीव भरून आल्यासारखें एकदम झालें. मीं डोळे उघडून पाहिलें तों आकाश स्वच्छ होतें. पक्ष्यांचें एक जोडपें एकमेकाला प्रेमाची साद देत माझ्या दृष्टीपुढून तरंगत गेलें. ज्या अनंत तारकांमुळें अनंतत्वाच्या विक्राळपणाची रात्रीं मला भीति वाटली होती त्यांपैकीं एकीचाही मागमूस नव्हता. जिकडे तिकडे स्वच्छ, उल्हासकारी नील वर्ण भरलेला दिसत होता. शास्त्रीय ज्ञानानें मला भेवडावणारें तें उशागतचें पुस्तक चांचपून पाहिलें तों तेंही तेथें नव्हतें.

मला मोठा विस्मय वाटला.

तितक्यांत माझी पत्नी हंसतमुखानें तेथें आली व म्हणाली, " हें काय, आज इतक्या लवकर कसं उठायचं ? "

मी हंसलों व विचारलें, " माझ्या उशागतीं पुस्तक होतं तें काय झालं ? "

" मीं उचलून आंत टेबलावर ठेवलं, " ती म्हणाली, " खाटेवरून खालीं वाकडंतिकडं पडलं होतं म्हणून उचललं---"

मी पुन्हा हंसलों.

तें पाहून माझी पत्नीही हंसली. पण मी कां हंसलों तें तिला कळणें शक्य नव्हतें. कारण, मी हंसलों अशा विचारानें कीं,

"त्या पुस्तकाची हिच्याकडून उचलबांगडी व्हावी हेंच उचित. स्त्री-प्रेमाच्या स्पर्शानें मानवी जीविताला आलेली दिव्यता जोंपर्यंत कायम आहे तोंपर्यंत विश्वाच्या अनंतत्वाचा भेसूर विचार करण्याऐवजीं त्या प्रेमाच्या उन्मादांत माणसानं सतत रहावं हेंच खरं!"

मीं पत्नीला म्हटलें, "कां हंसलीस?"

"इश्श, कां कसलं?" ती म्हणाली.

खरेंच! सुंदर गोष्टींचें कारण कसलें विचारायचें? कार्यकारण शोधायच्या या छंदानेंच माणसें भीतिदायक तत्त्वज्ञान उकरून काढतात, आणि स्वतःला व इतरांना उगीच कष्टी करतात!

—ऑक्टोबर, १९३१

१९

# न वाचलेल्या ग्रंथांची गोडी

माझ्या खोलींत पुस्तकें कांहीं फारशीं नाहींत; पण जीं आहेत तीं दहापंधरा दिवसांनीं जागचीं काढून पुन्हा व्यवस्थित लावण्याची मला खोड आहे. कदाचित् ही खोड असल्यामुळेंच खूप पुस्तकें विकत घ्यायची हौस मला नाहीं कीं काय कोणास ठाऊक? कारण खूप पुस्तकें घेऊन त्यांनीं कपाटेंच्या कपाटें भरून टाकिलीं, कीं तीं सारीं उसकटून लावायची इच्छा व सवड वर्षांतून एकदां तरी होईल कीं नाहीं शंकाच आहे. आणि फार पुस्तकें संग्रहीं असलीं, कीं त्यांजविषयींचा जिव्हाळा वाटेनासा होतो हेंही कांहीं खोटं नाहीं. नात्यागोत्यांतल्या माणसांचा खूप पसारा असला, कीं त्यांतल्या कुणाशींच आपले कळकळीचे ऋणानुबंध जुळत नाहींत, तद्वतच पुस्तकांचें आहे. पुस्तकांनीं कपाटें भरलीं कीं अंतःकरणाच्या कपाटांतला त्यांजविषयींच्या आपुलकीचा ग्रंथ आटोपलाच म्हणून समजावें. एकदां मी एका कोट्याधीशांना भेटावयास गेलों. त्यांचा

ग्रंथसंग्रह फारच अवाढव्य आहे. सबंध हिंदुस्थानांत तसा संग्रह कोणाजवळ नसेल म्हणतात. त्यांना मीं विचारलें, "अमुक अमुक पुस्तकें मला हवीं आहेत. तीं आपल्या संग्रहांत असतील ना ?" यावर त्या गृहस्थांनीं उत्तर दिलें, "बहुतेक असावींत. मला नक्की माहीत नाहीं. तें सारं आमच्या ग्रंथरक्षकाला ( Librarian ) माहीत."

तें त्या कोटयाधीशाचें उत्तर ऐकून त्याच्या अफाट ग्रंथसंग्रहाचें कौतुक वाटण्याऐवजीं स्वतःच्या संग्रहांतील ग्रंथांविषयींच्या त्याच्या शून्यवत् प्रेमाची मला कींव आली. राजेरजवाड्यांचीं अपत्यें ज्याप्रमाणें मातापितरांपासून इतकीं दूर असतात, कीं त्यांना आईबापांऐवजीं गडीमाणसांचाच खरा लळा लागतो, व तीं मध्यरात्रीं झोंपेंत उठलीं तर त्यांच्या तोंडून 'आई' अशी प्रेमानें ओथंबलेली हांक निघण्याऐवजीं आवडत्या शिपायाचेंच नांव तीं घेतात, तद्वतच तो कोट्याधीश व त्याचे सहस्रावधि ग्रंथ यांमधील सारा जिव्हाळा पार आटला होता. तें पाहून माझ्या मनांत आलें, कीं ज्याला ग्रंथांविषयीं खरा प्रीतिभाव ठेवायचा आहे, आणि त्यांच्या संगतीची गोडी पूर्णांशानें घ्यायची आहे त्यानें फार पुस्तकें विकत घेऊं नयेत हेंच खरें.

या विचारामुळेंही कदाचित् पुस्तकें विकत घेण्याच्या माझ्या इच्छेला पायबंद लागत असेल. कसेंही असो, पुस्तकांचा संग्रह वाढविण्यापेक्षां जो लहानसा संग्रह आहे त्यांतल्याच सर्व पुस्तकांचें व स्वतःचें प्रीतिरहस्य कायम ठेवण्यांतच मला अधिक

आनंद वाटतो. याचा अर्थ कोणीं असा समजूं नये कीं, माझ्या जवळचीं सारीं पुस्तकें मी पुनःपुन्हा वाचून काढतों. छे-छे! पुस्तक वाचून काढणें व त्याचीं पुनःपुन्हा पारायणें करणें हा त्यावर प्रीति करण्याचा एकच मार्ग थोडाच आहे? निदान मी तरी तसें मानीत नाहीं. त्यामुळें माझ्या छोट्याशा संग्रहांतसुद्धां पांचपंचवीस पुस्तकें अशीं निघतील, कीं जीं मजजवळ दोन दोन चार चार वर्षें आहेत, पण जीं मीं अजून वाचलीं नाहींत.

दर दहापंधरा दिवसांनीं जेव्हां आपल्या संग्रहांतलीं सारीं पुस्तकें काढून, पुसून, झटकून मी तीं व्यवस्थितपणें पुन्हा हारीनें मांडतों त्या वेळीं माझ्या ध्यानांत येतें, कीं आज किती तरी दिवस हीं पांच पंचवीस पुस्तकें वाचूं वाचूं असें आपण मनाशीं म्हणत आलों आहोंत. हीं सारीं पुस्तकें नामांकित लेखकांनीं लिहिलेलीं आहेत. त्यांपैकीं कांहीं तत्त्वज्ञानावरचीं आहेत, कांहीं नाट्यशास्त्रावरचीं आहेत, कांहीं संगीतासंबंधीं, कांहीं मानसशास्त्रांतल्या नवीन सिद्धान्तांसंबंधीं, व कांहीं चित्रकलेसंबंधीं आहेत. या सर्वंच विषयांची मला मनापासून अतिशय आवड आहे. जीं हीं पुस्तकें आज कित्येक दिवस वाचल्यावांचून मी पुनःपुन्हा नीट पुसून ठेवीत आलों तीं ठेवतांना प्रत्येक वेळीं तीं सारीं एकाहून एक सरस आहेत असं मीं मनाशीं म्हटलं आहे. तीं सारीं मला फार फार आवडतील याविषयीं मला तिळमात्र संशय नाहीं. कांहींत इतकें महत्त्वाचें ज्ञान सामावलेलें आहे, कीं तें मिळविलें नाहीं तर तो आपल्या

ठिकाणीं आपला आपल्यालाच मोठा उणेपणा वाटेल हें मला पूर्णपणें माहीत आहे. कांहींची लेखनशैली अतिशय सुरम्य आहे व तेवढ्यासाठीं तीं वाचलींच पाहिजेत याविषयीं माझ्या मनाची खात्री आहे. कांहींचे लेखक माझ्या लाडक्या लेखकांपैकीं आहेत, व त्यांनीं लिहिलेलें पुस्तक मजकडून न वाचलेलें रहावें ही मला अगदीं शरमेची गोष्ट वाटते.

परंतु असें असूनही हीं पांच पंचवीस पुस्तकें आज कित्येक दिवस माझ्या संग्रहीं न वाचलीं जातां राहिलीं आहेत. मात्र तीं मीं वाचलीं नाहींत तरी त्यांचा मीं अन्य तऱ्हेनें जो उपभोग घेतला आहे तोही मला त्यांच्या वाचनाइतकाच—कदाचित् त्याहून अधिकही—आल्हादकारक झालेला आहे. माझ्या संग्रहांतलीं सर्व पुस्तकें दर दहा पंधरा दिवसांनीं मी जागचीं काढतों व फडक्यानें स्वच्छ पुसतों हें मीं सांगितलेंच आहे. हें करतांना वाचल्यावांचून राहिलेल्या पुस्तकांपैकीं एखादें हातीं आलें, कीं तें झट्कन् पुसून दूर करणें माझ्याच्यानें होत नाहीं. मी त्या पुस्तकाच्या नांवाकडे किती तरी वेळ पहात राहतों, आणि लेखकाच्याही नांवाकडे कौतुकानें नजर टाकतों. मी मनाशीं म्हणतों, " टॉलस्टॉयचें हें 'The Slavery of Our Times' किती सुंदर असेल! टॉलस्टॉयचें हृद्गत पूर्णांशानें ज्याला समजून घ्यायचं असेल त्यानं हें पुस्तक वाचलंच पाहिजे. आतां सवड होतांच हेंच पुस्तक वाचायला घ्यायचं. हें जेव्हां मी वाचीन तेव्हां माझा वेळ किती सुंदर जाईल. या श्रेष्ठ

लेखकाच्या क्षुब्ध विचारसागरांत मला कितीतरी बहुमोल मोती, माणकं सांपडतील ! —बस् ! आतां फुरसत मिळाली कीं हें पुस्तक वाचल्यावांचून रहायचं नाहीं ! ठरलं !—"

असें मनाशीं ठरवून तें पुस्तक परत योग्य जागीं ठेवलें म्हणजे मला केवढें समाधान होतें. सुकृत करण्यांत जी मौज आहे तीच सुकृताचा मनाशीं निश्चय करण्यांतही असते. या न्यायानेंच कीं काय कोणास ठाऊक तें पुस्तक दूर करतांना माझ्या मनाला कांहीं एका विलक्षण प्रसन्नतेचा अनुभव येतो.

टॉलस्टॉयच्या या पुस्तकाप्रमाणेंच 'काव्यप्रकाशा'ची एक सुंदर बांधणीची आवृत्ति मीं आवडीनें विकत घेतली आहे. तीही दर वेळेस काढून पुसून परत ठेवतांना कितीतरी सुखकारक विचार माझ्या मनांत येऊन जातात. त्या ग्रंथाची प्रशंसा मीं अनेक विद्वानांच्या तोंडून ऐकली आहे, व विविध उपमालंकारांतील विशेष भेद दर्शविणारे त्यांतील श्लोक कोणीं पाठ म्हणून दाखविलेले जेव्हां जेव्हां माझ्या कानांवर आले आहेत त्या त्या वेळीं ते पाठ म्हणणाराचा मला मोठा हेवा वाटलेला आहे. त्यामुळें 'काव्यप्रकाशा'ची ती सुबक प्रत नीट जागच्या जागीं परत ठेवतांना तो ग्रंथ मी सवडीनें वाचीन त्या वेळीं मला सुखाचा केवढा तरी ठेवा सांपडेल असें माझ्या मनांत आल्यावांचून राहात नाहीं. मी इतकें मराठी साहित्य लिहितों, परंतु अलंकारशास्त्राचा पद्धतशीर अभ्यास माझ्या हातून अजून झालेला नाहीं. मी बी. ए. व्हायच्या आधीं बी. ए.च्या विद्यार्थ्यांस काव्यप्रकाश

परीक्षेसाठीं वाचावाच लागे. पण माझ्या वेळीं अभ्यासक्रम एकदम बदलला. चांगले विषय आणि चांगलीं पुस्तकें अभ्यासक्रमांतून बाद करण्यांत युनिव्हर्सिट्या भारी निष्णात असतात याचा त्या वेळीं मला पुरा अनुभव आला, व 'काव्यप्रकाश' मननपूर्वक वाचण्याची माझी संधि त्या वेळीं गेली. मात्र ती संधि अजून केव्हां तरी येणार आहे असें संतोषजनक आश्वासन माझ्या संग्रहांत असलेल्या 'काव्यप्रकाशा'च्या या मोहक पुस्तकाकडून मला पुनः-पुन्हा मिळत असतें. मी 'काव्यप्रकाश' वाचीन त्या वेळीं काव्योद्यानांतल्या निरनिराळ्या अलंकारपुष्पपत्रांचा जो परिमल मला घेतां येईल, त्यांतील विविध अलंकारांचीं उदाहरणें पाठ करतांना माझ्या अंतःकरणाला जो आल्हाद होईल, आणि माझ्या ज्ञानांतली एक बरेच दिवस राहिलेली उणीव दूर झाल्यावर माझ्या बुद्धीला प्रगल्भतेचा जो एक सुखकारक भरंवसा वाटेल—त्या सगळ्यांच्या रम्य पूर्वकल्पना, हा 'काव्यप्रकाश' पुसून, नीटनेटका, फळीवर ठेवतांना माझ्या मनांत उचंबळतात.

मी जीं पुस्तकें वाचल्यावांचून तशींच संग्रहीं ठेवीत आलों आहें त्या सर्वांच्या बाबतींत माझी वृत्ति अशी होते. जेव्हां जेव्हां मी त्यांजकडे पाहतों तेव्हां तेव्हां त्यांच्या वाचनानें माझ्या भावी कालांतल्या ज्या किती तरी घटका अत्यंत आनंदांत जाणार आहेत त्यांची साक्ष मला मिळालीसें वाटतें. आज इतके दिवस जवळ असूनही तीं पुस्तकें मीं वाचलीं नाहींत अशा विचारानें खेद अगर विषाद वाटण्याऐवजीं, त्या पुस्तकांच्या रसास्वादांत

माझ्या आयुष्याचे जे दिवस जाणार आहेत त्यांच्या सुखस्वप्नांनीं माझें चित्त प्रसन्न होतें.

आणि माझ्या या प्रसन्नतेचें कोणाला आश्चर्य वाटत असेल तर त्यानें असा विचार करावा, कीं जें आपण केलें त्यापेक्षां जें करायचे बेत आपण आपल्या मनाशीं हजारदां करतों त्यांतूनच आपल्या या विचित्र मानवी जीवनांतला आनंद बहुतांशीं उगम पावत नाहीं काय? जिंकलेल्या लढायांपेक्षां योजलेल्या युद्धांच्या धुमश्चक्रीचीं कल्पनाचित्रेंच वीरपुरुषांस मोठीं चित्तवेधक वाटत असतात. केलेल्या काव्यांपेक्षां जीं काव्यें करण्याचे बेत कवीनें आपल्या मनाशीं वारंवार केलेले असतात, त्यांतच त्याच्या आनंदाचा ठेवा खरोखर सांठविलेला असतो. अमुक एका संविधानकाची कादंबरी अगदीं नवीन अशा निवेदनशैलीनें लिहिण्याचा बेत मी कितीदां तरी आपल्या मनाशीं करतों. हा बेत करतांना त्याबद्दल अधिक खोल अगर सविस्तर विचार करण्याची मला कधीं इच्छा होत नाहीं. तसें मी करूं लागलों तर माझ्या त्या योजनेला अधिकाधिक निश्चित स्वरूप येऊन नुसता गमतीचा बेत करण्यांतला आनंद बिघडेल अशी मला भीति वाटते म्हणून मी मनाशीं म्हणतों, “ अशी अशी कादंबरी लिहायची आहे बुवा आपल्याला एकदां!” कधीं कधीं ही माझी कल्पना मी माझ्या प्रीतींतल्या मंडळीपुढें बोलूनही दाखवितों. आणि हें करतांना मला जो विलक्षण आल्हाद वाटतो त्याच्यापुढें माझ्या हातून प्रत्यक्ष लिहून झालेल्या कादंबऱ्यांचा आनंदही फिका पडेल!

मीं पुष्कळ प्रवास केलेला आहे, पण कांहीं स्थळें अशीं आहेत, कीं जेथें जावयाचा बेत मीं किती वेळां केला असेल त्याला गणति नाहीं. त्या स्थळांच्या प्रवासास मी कधीं खरोखर निघेन असेंही मला वाटत नाहीं. परंतु हितगुजांतल्या मित्रांशीं गप्पा सुरू झाल्या, कीं " आपल्याला काश्मीरांत जायचं आहे बुवा एकदां ! " किंवा " तें कांहीं नाहीं, या उन्हाळ्याच्या सुट्टींत आपण सीलॉनची सफर करणार, बस् ! " असें मी वारंवार म्हणतों. हें म्हणण्यांत एक प्रकारचा अवर्णनीय आनंद आहे हें कोण नाकबूल करील ?

हाच आनंद न वाचतां ठेवलेल्या माझ्या संग्रहांतल्या त्या पुस्तकांत आहे. तीं पुस्तकें म्हणजे माझ्या ललाटीं मीच आपल्या हातांनीं आगाऊ लिहून ठेवलेल्या हर्षभराच्या घटका च मला वाटतात. आपल्या नशिबांत भरपूर संपत्ति असल्याचें ज्योतिष्यानें सांगितलें म्हणजे जो आनंद होतो तसलाच आनंद त्या पुस्तकांपासून मला पुनःपुन्हा मिळतो. वाचनसौख्याचा विशुद्ध आनंद माझ्या नशिबांत भरपूर असल्याची ग्वाही तीं पुस्तकें मला हंसतमुखानें देतात. पुढें केव्हां उपयोगी पडावी म्हणून कृपण ज्याप्रमाणें संपत्ति सांचवून ती न खर्चितां तिच्याकडे नुसता वारंवार पाहतो, तद्वत् माझे भावी सुखाचे क्षण ज्यांत भरलेले आहेत तीं हीं पुस्तकें पुनःपुन्हा पाहण्यांत व पुसून साफ करून जागच्या जागीं ठेवण्यांत मला अनिवार आनंद होतो.

आणि कृपणाप्रमाणेंच या सुखसंचयाचा प्रत्यक्ष व्यय करण्याचें

माझ्या जिवावर येतें. जीं पुस्तकें न वाचतां तशींच दिवसानुदिवस मीं आपल्या संग्रहीं ठेवलीं आहेत, त्यांतलें एखादें घेऊन वाचून टाकावयास माझें मन धजत नाहीं. तसें केल्यानें माझ्या भावी कालांतली सुखाची एखादी घटका नाहींशी होईल अशी मला शंका व धास्ती वाटते. ज्या सुखाच्या सेवनाच्या नुसत्या कल्पनांनींच मला किती तरी आनंदाचें व्याज आजही उपभोगतां येतें तें मुद्दलांतच कमी करण्यांत कोणता शहाणपणा? म्हणून माझ्या कपाटांतलीं तीं न वाचलेलीं पुस्तकें माझ्याकडून कधीं वाचलीं जातील हें मला आज कोणीं विचारूं नये, आणि तें मीं कोणाला सांगूं नये. "जें आज करतां येत असेल तें उद्यांवर ढकलूं नका," असा कोणींसा उपदेश केलेला आहे ना! परंतु हें सूत्र अबाधित समजायला मी तयार नाहीं. या माझ्या न वाचतां तशाच ठेवलेल्या ग्रंथांच्या बाबतींत तर मी स्वतःला नेहमीं बजावीत असतों, कीं "जें पुस्तक उद्यां वाचतां येण्यासारखें असेल तें आज वाचूं नकोस!" हें माझें सूत्र व्यवहारांतल्या सर्वच सुखोपभोगांस लागू करावयाचें किंवा कसें तें ज्याचें त्यानें तारतम्यानें ठरवावें.

—जानुआरी, १९३२

१६

# जुनीं पुस्तकें !

लहानपणीं नव पुस्तक विकत घ्यायच म्हटलें कीं केवढा आनंद होत असतो ! एक इयत्ता पास होऊन पुढच्या इयत्तेंत पाऊल पडलें, कीं त्या इयत्तेला लागणारीं सारीं पुस्तकें बाजारांत जाऊन खरेदी करायला एक दिवसाचाही उशीर झालेला मनाला खपत नाहीं. वडीलधारीं माणसें जुनीं आडगिऱ्हाइकी पुस्तकें घ्यावयास सांगतात तेव्हां मनस्वी दुःख होतें. कोणा नातलगाकडून अगर स्नेह्यांकडून जुनीं पुस्तकें फुकट मिळविण्याचा वडील माणसें प्रयत्न करतात त्याचाही संताप येतो. अशा वेळीं वाटूं लागतें, ज्याच्या सबंद वंशांत एकही सुशिक्षित माणसाचा संबंध नसेल तो विद्यार्थी किती दैववान ! जुन्या पुस्तकांचें दुर्दैव त्याच्या वांट्याला कधीं येणें शक्य नाहीं ! जुन्या पुस्तकांचा क्रयविक्रय करणाऱ्या दुकानदारांचा त्या वेळीं अगदीं तिटकारा येतो. वाटतें, परमेश्वराच्या या जगांत न्याय नाहीं हें सिद्ध करायला लोक भूकंपांचीं आणि जलप्रलयांचीं

उदाहरणें कशाला देत बसतात? ज्या जगांत नवीं पुस्तकें घ्यायची विलक्षण इच्छा तर असते, आाणि त्या इच्छेच्या मार्गांत विघ्न आणणाऱ्या जुन्या पुस्तकांच्या वखारी अगदीं राजमार्गावर उघडपणें असूं शकतात त्या जगांत ईश्वराचा न्याय तो कोठें उरला म्हणायचा!

खरोखरच लहानपणीं असें वाटतें. नवीं पुस्तकें विकत आणणें, यांना पुठ्ठे घालणें, तीं बिघडतील म्हणून लोकांच्या हातीं न देणें—भावंडांच्या हातांत तर कधींच न देणें, स्वतः तीं उघडतांनासुद्धां अगदीं जपून बेतानें उघडणें, त्यांच्यावर अगदीं सुंदर अक्षरानें नांव घालायचें ठरवून अखेर अगदींच वांकडें तिकडें नांव घालतांना हटकून पडणारा शाईचा ठिपका चाकूनें खरडून टाकणें—या साऱ्या सोहाळयाचें सुख अनुपमेय आहे असें लहान वयांत सर्वांना वाटत असतें. इतकेंच नव्हे, तर कोरें करकरीत पुस्तक हातीं आलें तरच त्यांतल्या मजकुराविषयीं उत्सुकता वाटण्याचें तें वय असतें. जुनें, मळकट, आधीं वाचणारानें पेनसिलीच्या खुणांनीं चितारलेलें पुस्तक मिळालें तर ह्यांतला मजकूर उपेक्षणीय वाटतो. मी शाळेंत प्रथम इतिहास शिकण्याच्या इयत्तेंत गेलों, आणि माझा हट्ट न ऐकतां माझ्या वडिलांनीं एक जुनें पुस्तक मला वापरायला लावलें, तेव्हां आज ज्या जागीं मुंबईपुण्यासारखीं गजबजलेलीं शहरें आहेत त्या जागीं पूर्वीं दण्डकारण्य होतें हें मला खरें वाटेना, बहामनी राज्याचीं शकलें उडालीं याबद्दलही क्षिति वाटेना, आणि

शिवाजीनें बालवयांत तोरणा सर केला तरी माझ्या भावना उचंबळून येईनात. पुढें भेंड्यांच्या चढाओढींत बक्षिस मिळून माझ्या हातीं इतिहासाचें कोरें करकरीत पुस्तक आल्याबरोबर मात्र त्या साऱ्या ऐतिहासिक हकीगतींना जणुं नवी झिलई मिळून त्यांत माझें मन रमूं लागलें.

पण आतां मात्र तसें होत नाहीं. बालवयांतले आनंद वस्तूंच्या स्वभावापेक्षां आपल्या वृत्तीवर अवलंबून असतात म्हणून मोठेपण येतांच सुखदुःखें निराळीं होतात म्हणा, किंवा कांहीं म्हणा, तसें होतें खरें. आज नव्याकोऱ्या, करकरीत पुस्तकां-पेक्षां जुनीं पुस्तकें मला अधिक हवींशीं वाटतात! माझ्या लहानशा संग्रहांत जीं पुस्तकें कित्येक वर्षें आहेत, जीं मीं पुनः-पुन्हा वाचलेलीं आहेत, ज्यांच्या पानापानांवर माझ्या ठरीव खोडीला अनुसरून मीं जांभळ्या तांबड्या खुणा केलेल्या आहेत, तीं मला विशेष प्रिय वाटतात. मी जीं नवीं पुस्तकें विकत आणतों त्यांपेक्षांही तीं मला प्रिय वाटतात---आणि नवीं पुस्तकें जुनीं झालीं म्हणजे त्यांस माझ्या प्रीतींत स्थान मिळतें.

नवीन पुस्तकें नवीनपणीं माझ्या दृष्टीला आकर्षक वाटतात, पण माझ्या भावनांस तीं स्पर्श करूं शकत नाहींत. त्यांचे रंगी-बेरंगी पुट्ठे मोहक वाटतात, त्यांची छपाई व बांधणी नजरेंत भरते, त्यांच्या मुखपृष्ठावरचीं चित्रें सुंदर दिसतात. परंतु त्यांना पाहून माझें अंतःकरण हालत नाहीं. त्यांचें व माझें कांहीं जिव्हाळ्याचें नातें आहेसें वाटत नाहीं. माझ्या घरीं पहिल्यांदाच

चहासाठीं येणारीं नव्यानें ओळखीचीं झालेलीं माणसें नीटनेटकी वेषभूषा करून आलीं म्हणजे त्यांना पाहून दृष्टि संतुष्ट होते, पण अधिक कांहीं होत नाहीं, तसें नव्या कोऱ्या पुस्तकांच्या बाबतींत माझें होतें. त्यांचा माझा कांहीं ऋणानुबंध आहेसें वाटत नाहीं. उलट एखादा जिवलग स्नेही भेटला कीं, ज्या भावना हृदयांत गर्दी करतात, त्याच माझ्या जवळच्या जुन्या पुस्तकांपैकीं एखादें हातांत घेतलें कीं माझ्या अनुभवास येतात. "ग्रंथ हे स्नेही होत" असें कोणा विद्वानानें म्हटलें आहे ना ? त अर्धें खरें आहे. त्यांत बदल करून असें म्हटलें पाहिजे, कीं "नवे, कोरे ग्रंथ हे माणसाच्या मामुली परिचितासारखे असून जुने ग्रंथ हे जिवलग दोस्ताप्रमाणें होत."

कोणी कांहीं म्हणो, मला असें वाटतें खरें. माझ्या संग्रहीं मराठी हॅम्लेट नाटकाचें पुस्तक आहे. तें जेव्हां जेव्हां मी चाळूं लागतों तेव्हां तेव्हां किती तरी वर्षांचा कालखंड एकदम ओलांडून १९१२ सालच्या माझ्या जीविताचा मी पुन्हा अनुभव घेत आहेंसें मला वाटतें. कॉलेजांत जातां येतां गणपतराव जोशांच्या हॅम्लेट नाटकाच्या भिंतीवर लागलेल्या जाहिराती पाहून चित्त उत्कंठेनें व्याकुळ झालेलें आहे, गणपतरावांचीं आतां हीं अखेरचीं नाटकें असें लोकांनीं म्हटलेलें ऐकल्यानें व आपण अजून त्या असामान्य नटाला पाहिलाही नाहीं हें मनांत आल्यानें ती उत्कण्ठा अनावर झाली आहे, वडील नाटकाला धाडतील कीं नाहीं अशा सभय शंकेनें छळ मांडला आहे, अखेर वडिलांची

परवानगी काढून जेवण उरकून—नव्हे अर्धें पानांत टाकून—किर्लोस्कर थिएटरमधील आठ आणे दराच्या खेंचाखेंचींत आपण बसलों आहोंत, आणि नाटक सुरू होऊन पहिल्या कंटाळवाण्या प्रवेशानंतरच्या दरबारांत राजानें "चंद्रसेना, अजून ही तुझी मुखश्री खिन्न आणि म्लान कां बरं?" असें विचारतांच "नाहीं काका; मला खिन्न असण्याचं कांहींच कारण नाहीं! मी आनंदांत आहें!" हें वाक्य गणपतरावांनीं उच्चारलेलें ऐकतांच त्यांतल्या साऱ्या संमिश्र भावनांची विद्युल्लहरी रंगभूमीवरून निघून आपल्या सर्वांगांतून जात आहे असें वाटतें!

त्या हॅम्लेट नाटकाच्या पानागणिक गणपतरावांचा असामान्य अभिनय माझ्या नेत्रांपुढें दिसूं लागतो, आणि ज्याची तोड होणें कठिण आहे असा त्यांचा तो मधुर, खणखणीत, अनिर्बंध आवाज ऐकूं आल्याचा भास होतो. त्यामुळें माझ्या संग्रहींच्या त्या जुन्या पुस्तकांत केवळ ग्रंथकारानें जो मजकूर लिहिला तेवढाच नसून माझ्या स्वतःच्याच जीवनक्रमांतला कांहीं मजकूर आहेसें मला नेहमीं वाटतें. मग तें पुस्तक मला अतिशय प्रिय कां नसावें?

हरिभाऊंची 'मायेचा बाजार' मला तिच्यांतील भावना-विलासाच्या वैचित्र्यामुळें तर आवडतेच, पण ती माझ्या विशेष आवडीची आहे याचें कारण ती ज्या परिस्थितींत मीं वाचली तिचाही अनुभव ती वाचूं लागतांच मला पुन्हा येतो. दिवाळीच्या पहिल्या दिवसाचीं अभ्यंगस्नानें नुकतींच आटपलीं आहेतसें वाटतें, आपल्या बरोबरीचीं मुलें पत्ते, विटीदांडू, चेंडू-

लगोरी खेळायला निघत आहेत, आपल्याला चलण्याचा आग्रह करीत आहेत, आपण न जाण्याचा हट्ट दाखविल्यामुळ आपल्यावर रागावलीं आहेतसें वाटतें, बाहेर अंगणांत चाललेल्या त्यांच्या आरड्याओरड्याचा अस्पष्ट आवाज कानीं येत आहे व आपण मात्र माजघरालगतच्या अर्धवट उजेडाच्या निवांत खोलींत त्या कादंबरींतल्या पात्रांशीं समरस होऊन कथानकाबरोबर वहात जात आहोंतसें वाटतें! ती कादंबरी मी केव्हांही वाचूं लागलों तरी हा सारा अनुभव येतो! रेनॉल्ड्सची Soldier's Wife ही कादंबरी आतां केव्हांही वाचूं लागलों तरी वाटतें, अपरात्र झाली आहे, घरांतलीं सारीं माणसें निद्रावश झालीं आहेत, दिवा उशाशीं मोठा करून आपण अंथरुणावर पडलों आहोंत, आणि बाहेर धो धो मुसळधार पाऊस पडत आहे! लो. टिळकांचें गीतारहस्य उघडून चाळूं लागलों, कीं वाटतें, आपली एम्. ए.ची परीक्षा जवळ आली आहे, आपला अभ्यास हवा तेवढा झाला आहे कीं नाहीं अशी हुरहुर चित्ताला त्रास देत आहे, परीक्षेंत पहिला नंबर न येऊन सुवर्णपदक न मिळालें तर—ही कल्पनाच तापदायक होत आहे, तें पदक मिळालें तर हें करूं तें करूं अशा मनोरथांचा एक अस्पष्ट थवा उत्पन्न होऊन ऊर भरून येत आहे! .......

असें किती सांगूं? माझ्या जवळच्या साऱ्याच जुन्या पुस्तकांची ही तऱ्हा आहे.

त्या पुस्तकांत त्या त्या ग्रंथकारानें लिहिलेल्या मजकुराच्या भरीला माझ्या आत्मवृत्ताचा किती तरी मजकूर आहे असें मला

वाटतें. किंबहुना माझ्या जवळचीं हीं सारीं जुनीं पुस्तकें एकत्र केलीं तर त्या सर्वांत मिळून माझें बहुतेक आत्मचरित्र सांपडेल. मात्र तें अशा दिव्य, गुप्त लिपींत लिहिलेलें आहे कीं तीं दुसऱ्या कोणालाही लावतां यायची नाहीं. आत्मवृत्तांतल्या त्या उताऱ्यांचा लेखक मीच आणि वाचकही माझा मीच ! त्या पुस्तकांचीं कोणीं कितीही आर्जवें केलीं, किंवा त्यांना कसलीही लालूच दाखविली तरी त्यांच्या पृष्ठापृष्ठांतून सांठविलेलीं माझ्या जीवनक्रमांतील रहस्यें तीं कधींही कोणाला कळूं देणार नाहींत ! आणि म्हणूनच त्या पुस्तकांना जिवाभावाचे स्नेही मानायचें ! ज्याला मित्राचीं रहस्यें आपल्या मनांत गुप्त जतन करून ठेवतां येतात तोच खरा मित्र नव्हे काय ?

—मार्च, १९३३

१७

# सहल

पायीं फिरायला जायच्या अनेक वेळा आहेत, आणि अनेक तऱ्हा आहेत. मला त्या सगळ्याच वेळा आवडतात; पण सगळ्या तऱ्हा मात्र आवडत नाहींत. अमुकच वेळेस फिरायला जाण्यांत मजा आहे असें ज्यांना वाटत असेल त्यांना फिरायला जाण्यांतलें खरें सुख समजलेंच नाहीं असें मी म्हणेन. फेरफटका करण्याच्या मजेला वेळेचें बंधन कुठलें? संगीतशास्त्रांत सगळ्या रागरागिणींच्या ठरीव घटका मानलेल्या आहेत. भैरव अमक्याच प्रहरीं गावा, यमन अमक्याच प्रहरीं म्हणावा, सारंग रागाला अमुक प्रहर अनुकूल आहे, किंवा दरबारी रागाशीं अमुक प्रहराचा नैसर्गिक संवाद आहे असें वस्ताद लोक मानतात, व त्याप्रमाणें आपल्या शागीर्दांना तालीम देतात. परंतु भुंवया किंचित् वढवून गंभीर मुद्रेनें विविध रागांच्या कालांबद्दलचे विधिनिषेध सांगणाऱ्या वस्तादजींना जर शिष्यानें विचारलें, " खांसाहेब, भैरवीचा ठरलेला प्रहर कोणता?" तर त्यांच्या भुंवयांवरची ती

लहानशी अढी एकदम लुप्त होईल, त्यांच्या मुद्रेवरचा गंभीर भावही विरून जाईल, आणि मोठ्या खुषींत आल्यासारखी चर्या करून ते हंसत म्हणतील, "बेटा, भरवी सदारंजनी रागिणी आहे. ती केव्हांही गावी! केव्हांही गायिली तरी तिची गोडी पदा व्हायची तशी होईल!" हाच न्याय माझ्या मतानें फिरायला जाण्याच्या बाबतींत खरा ठरेल. फिरायला अमुक प्रहर चांगला किंवा वाईट असें कुठलें? फिरायला केव्हांही जावें. त्यापासून जो आनंद मिळायचा तो मिळणारच!

संध्याकाळीं रपेट करण्यांत मजा आहे तशीच ती सकाळीं करण्यांतही आहे—नव्हे, स्थळ अनुकूल असेल तर भर दुपारच्या घटकेलाही करण्यांत आहे! मी महाबळेश्वरला गेलों म्हणजे तर कटाक्षानें भर दोन प्रहरीं हिंडायला निघतों. त्या वेळीं गर्द हिरव्या झाडीनें झांकलेल्या लाल रस्त्यावर सूर्यप्रकाशाचे लहान मोठे कवडसे सरळ माथ्यावरून पडलेले असतात. उजव्या डाव्या बाजूंकडच्या वृक्षराजींच्या शाखांच्या फटींतून दिसणाऱ्या आकाशाला मोठा मनोहर फिकट निळा रंग चढलेला असतो. सकाळच्या व संध्याकाळच्या घटकेला ऐकूं येणारी पक्ष्यांची किलबिल त्या वेळीं अगदीं बंद असते. सारे पक्षी कोठें नाहींसे होतात कोण जाणे! पण वल्लभानें कामिनीस आलिंगनासाठीं जवळ ओढतांच त्या आलिंगनांत आपली अडचण नको हें ओळखून आपण होऊन ढळणाऱ्या तिच्या वक्षभूषणाप्रमाणें, वृक्षराजींच्या अगदीं समीप येऊन तिच्यावर करपाश टाकणाऱ्या सूर्याला

पाहतांच तिचे हे नैसर्गिक अलंकार दूर होतात येवढें खरें! माणसांची रहदारीही त्या वेळीं अगदीं बंद असते. रात्रीची शांतता आणि दिवसाचा पूर्ण प्रकाश यांचा त्या वेळचा तो मिलाफ अतिशय आल्हादकारी असतो, आणि त्या आल्हादाचा अनुभव घेत फिरणाराला आपण पृथ्वीवर आहोंत, कीं अनंत अंतराळांतून तरंगत चाललों आहोंत असा गमतीचा भास क्षणभर तरी झाल्यावांचून रहात नाहीं. या आभासाच्या मोहानें तरी सकाळींच किंवा संध्याकाळींच फिरावयास जाणाऱ्या लोकांनीं मी म्हणतों तसें महाबळेश्वरसारख्या ठिकाणीं भर दोनप्रहरीं एकदां फेरफटका करून पहावा.

संध्याकाळच्या फिरण्यांत मौज नाहीं असें माझें म्हणणें नाहीं. त्या घटकेलाही आपल्या भोंवतालच्या सृष्टीला आल्हादकारक स्वरूप प्राप्त झालेलें असतें. सूर्य झरझर खालीं पश्चिम क्षितिजाकडे उतरत असतो; आणि प्रिय स्त्रीचा निरोप घेतांना पुन्हां तिच्या मंदिराचा सहज शोध लागावा म्हणून त्यावर चोरून खूण करून ठेवणाऱ्या चतुर प्रणयी पुरुषाप्रमाणें तो आपल्या हातांनीं पृथ्वीवर सुवर्णरंग माखून ठेवीत असतो. त्या लालसर सोनेरी प्रकाशानें वस्तुमात्राला कांहीं विलक्षणच शोभा आलेली असते. निसर्गतःच शोभिवंत असणारीं फळाफुलांचीं झाडें तर रम्य दिसतातच, पण शेताभोंवतालचीं कुंपणवजा रानवट झाडेंझुडपेंही खुलून दिसतात. स्वभावतःच सौंदर्यसंपन्न असलेले जलाशयच नव्हे, तर राकट दगडाधोंड्यांनीं विखुरलेल्या लहानमोठ्या

टेकड्यादेखील दृष्टीला सुखदायक वाटतात. आणि अशा एखाद्या टेकडीच्या माथ्यापर्यंत चालत जाऊन तेथें विसाव्यासाठीं उभें राहिलें, आणि मागें टाकलेल्या शहराकडे अगर गांवाकडे वळून पाहिलें, कीं सूर्यप्रकाशाच्या त्या भडक झळाळींत देवळांचीं सुवर्णशिखरें अगर राजप्रासादांचीं डौलदार शृंगेंच नव्हे, तर साध्या चंद्रमौळी घरांचीं खपरेलें देखील किती रमणीय दिसतात! निसर्गाच्या एकमेव स्पर्शाच्या जादूनें दुनियेंतले सारे भेद नष्ट होतात असें कोणा इंग्रज लेखकानें जें म्हटलें आहे त्यांतला खरा अभिप्राय मला अशा वेळीं कळतो.

सकाळीं फिरायला जाण्याचा आनंद कांहीं निराळाच आहे. एक तर सृष्टि जागी होत आहे त्याच घटकेला आपणही उठलों आहोंत ही जाणीवच मोठी सुखाची असते. त्या जाणिवेनें आपण सृष्टीशीं समरस झालों आहोंत असें वाटूं लागतें, व चित्ताला आणि दृष्टीला अपूर्व ताजेपणा येतो. सृष्टींतील वस्तू न् वस्तू गडबडीनें उठून कसल्या तरी मोठ्या महत्त्वाच्या क्रान्तीची मार्गप्रतीक्षा करीत आहे असा भास होतो. आणि ही क्रान्ति कोणती अशा संशयानें मन गोंधळतें न गोंधळतें तोंच पर्वक्षितिजाखालून भला मोठा तेजोगोल डौलानें वर वर चढलेला दिसतो, आणि उरल्यासुरल्या अंधकाराच्या अवशेषाबरोबरच आपल्या मनाचा गोंधळही संपतो. खेड्यापाड्यांतून भाज्या किंवा गवत डोक्या-वर घेऊन येणाऱ्या बायका मग अधिकच झपाझप चालूं लागलेल्या दिसतात, व ओझ्याचा आणि वाटचालीचा शीण

विस्मरण्यासाठीं सुरू असलेल्या त्यांच्या ग्रामगीतांची लयही वाढल्यासारखी वाटते.

चांदण्या रात्रीं तर फिरण्याची मिजास कांहीं औरच असते. दिवस संपला असल्यामुळें शिष्टाचाराचीं बंधनें शिथिल झालींशीं वाटतात, आणि फिरायला जाण्यासाठीं अमुक पोषाख असावा हा एरवीं मान्य करावा लागणारा नियम झुगारून देतां येतो. किंबहुना, अशा वेळीं व्यवस्थित कोट टोपी घालून फिरलें तर तें फिरणें कसलें असें वाटतें. पोषाखाचा अंशतः त्याग करण्याचें हें सौख्य स्त्रियांना उपभोगतां येत नाहीं हें त्यांचें केवढें दुर्भाग्य! हें दुर्भाग्य संपविण्यासाठीं तरी साडी चोळी पोलक्याच्या भरीला आणखी कोणत्या तरी वस्त्राचा स्त्रियांनीं आपल्या वेषभूषेंत अवश्य अंतर्भाव करावा. खरोखरच कोट टोपी टाकून देऊन, आणि धोतराचा देखील काचा कसून नेसण्याऐवजीं सोगा पुढें लोळता टाकून निघाल्याखेरीज चांदण्यांत भटकण्याची खरी मौज मिळत नाहीं. मी कॉलेजांत होतों तेव्हां वसतिगृहापासून जवळ असलेल्या टेकडीवर भटकायला जाऊन अपरात्रीं एक एक दोन दोन वाजेपर्यंत आम्ही कितीदां तरी बसलों असूं! त्या वेळीं गप्पागोष्टींना आणि हंसण्याखिदळण्याला ऊत येई. ज्यांना गातां येत असे तेही गात, आणि ज्यांना येत नसे तेही गात. कोणी नाटकांतलीं भाषणें खड्या आवाजांत म्हणत. मी कधीं कधीं बांसरी वाजवीत असें, किंवा कधीं गप्पांत सामील होत असें. परंतु मला अगदीं मनापासून आवड वाटे ती टेकडीच्या त्या माथ्यावरच्या

शिलातलावर खुशाल उताणें पडून आभाळांत तरंगणाऱ्या चंद्र-बिंबाकडे टक लावून पाहण्याची! तसें पडून पाहिलें, कीं पृथ्वी-वरच्या साऱ्या वस्तू दृष्टीआड होत, नभोमंडळांतल्या तुरळक तारका आणि सहस्र धारांनीं चंद्रिकेचा वर्षाव करणारा मध्या-वरचा दीप्तिमान गोल यांखेरीज कांहींच दिसत नसे, आणि स्वर्ग व पृथ्वी यांतील अंतर एकदम नाहींसें झाल्याचा भास होई. कॉलेजांत जे विषय मी शिकलों ते सारे एक दोन वर्षांतच मी पार विसरलों, पण चांदण्या अपरात्रीचा हा दिव्य आभास माझ्या स्मरणांत अजून ताजा आहे!

सारांश, केव्हांही फिरायला निघालें तरी त्यांत कोणत्या तरी प्रकारचा आल्हाद असतोच. अमुकच प्रहरीं फिरायला जावें असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं. निदान मला तरी फिरण्याच्या सगळयाच वेळा सुखकारक वाटतात.

फिरण्याच्या सगळ्या तऱ्हा मात्र मला आवडत नाहींत. व्यायामासाठीं फिरायला जाण्याची कल्पना तर मला अगदीं चमत्कारिक वाटते. जलद चालीनें चार मैलांची रपेट केली तर व्यायाम होत नाहीं असें माझें म्हणणें नाहीं. मी सुद्धां क्रिकेट, टेनिस सोडून अशा प्रकारें व्यायाम पुष्कळदां घेतों. पण अशी रपेट करणें म्हणजे फिरणें नव्हे. व्यायामासाठीं चालणें आणि फेरफटका करणें यांत महदंतर आहे. व्यायाम व्हावा अशा तऱ्हेनें चालणें अशक्य नाहीं. पण त्या चालण्याला सहल करणें कसें म्हणतां येईल? तशीं चार मैलांच्या चालीला सहल म्हणायचें

म्हणजे मारवाडणीच्या अंगाखांद्यावरच्या सोन्याच्या ओझ्याला अलंकार समजण्यासारखेंच होईल. मोलाचा माल म्हणून त्या सोन्याचा गुण मानतां येईल, पण त्याला अलंकाराची योग्यता कधीं यायची नाहीं. तद्वतच धांवपळीच्या चालण्यानें व्यायाम होईल, पण त्यांत फिरण्याची मौज कधीं मिळायची नाहीं. व्यायाम हवा असेल तर फिरण्याची बुद्धि टाकली पाहिजे, आणि फिरायचें असेल तर व्यायामाची कल्पना मनांत ठेवतां कामा नये.

याच दृष्टीनें चार मित्रांच्या बरोबर गप्पा मारीत फिरायला जाण्याची तऱ्हाही मला पसंत नाहीं. अशा फिरण्यांत धड गप्पाही होत नाहींत आणि धड सहलही होत नाहीं. बोलणें आणि फिरणें यांचा स्वभावतःच विसंवाद आहे अशी माझी समजूत आहे. म्हणून खरी सहल करायची झाली म्हणजे एक देखील मित्र बरोबर नसावा असें मला वाटतें. मी एकटाच घराबाहेर पडतों, आणि मन मानेल त्या दिशेनें चालूं लागतों.

अशा वेळीं अमक्या स्थळापर्यंत जायचें असें मी मनाशीं योजीत नाहीं. पुष्कळांची फिरण्याची पद्धति अशी असते, कीं विवक्षित स्थळीं पोंचून तेथून परतण्याच्या कल्पनेनें ते निघतात. ही कल्पना अगदीं घातुक. सहल करण्यांतली खरी मिजास या कल्पनेनें नाहींशी होते. अमक्या ठिकाणीं जायचें असें मनाशीं ठरविलें, कीं आपण आजूबाजूस लक्ष न देतां सरळ त्या स्थळीं जातों. आणि असें केल्यावर सहल ती काय राहिली?

स्वच्छंदानें रमत गमत जाणें म्हणजेच खरी सहल. आमच्या कोल्हापूरला रंकाळा तलाव आहे त्याची सबंध फेरी काढण्यासाठीं पुष्कळ मंडळी संध्याकाळीं बाहेर पडतात. मीही त्या बाजूला कधीं कधीं फिरायला जातों. परंतु फेरी पुरी करायच्या निश्चयानें कधींच मी निघत नाहीं. वाटेंत जेथें माझें मन रमेल तेथें मी खुशाल दहापांच मिनिटें उभा राहतों. एखाद्या वेळीं बसायाची लहर आली तर बसतों देखील. आणि असें केल्यानें माझें चित्त रिझविणाऱ्या किती गोष्टी मला आढळतात त्यांना गणतीच नाहीं. मध्येंच कोठें तरी गुडघाभर वाढलेल्या गवतांच्या टोंकांवर निमिषमात्र बसणारीं व लगेच उठणारीं फुलपांखरें एकमेकांत शिवाशिवीचा डाव खेळत असतात. पुरें पाऊलही ज्यांत बुडणार नाहीं अशा एखाद्या उथळ जलसंचयांत हरतऱ्हेचे शेंकडो जलकीटक तरंगत असतात. अशा वेळीं त्या कीटकांच्या क्षुद्रपणाकडे माझें लक्ष जातच नाहीं. ते ज्या मिजासीनें त्या इवल्याशा जलपृष्ठावर पडलेले असतात तिच्या सौंदर्याचा मनाला मोह पडतो. एकदां अशा एका जलसंचयांतला तो कीटकांचा थवा कशानें तरी विलक्षण क्षुब्ध झाला होता, व ठिपक्यायेवढाले ते सारे जीव जणूं प्राणांवर उदार होऊन चेवानें एकमेकांवर तुटून पडत होते. त्यांतही माझ्या दृष्टीला सौंदर्य दिसलें, व मी त्यांचा तो मनोहर प्रक्षोभ पहात किती तरी वेळ उभा राहिलों. एखाद्या स्थळीं पांढऱ्या स्वच्छ बगळ्यांचा थवा लव्हाळ्यांच्या उंच उंच पात्यांखालीं बसलेला

असतो, आणि गंमत अशी कीं थवा करून बसलेले ते बगळे एकमेकांशीं एक शब्द देखील बोलत नाहींत. चिमण्यांचा थवा जमला कीं चिवचिवाट सुरू होतो, दहा कावळे जमले कीं कावकाव माजते, आणि हे बगळे मात्र अगदीं निःशब्द करीं बसतात, हें कोडें मला कधीं उलगडलेलें नाहीं. त्यामुळें मी मोठ्या विस्मयानें आणि कुतूहलानें त्यांचा तो थवा पहात बसतों. ते बगळे जसे तेथें उगीचच येऊन बसतात तसेच कांहीं वेळानें उगीचच उडून जातात. मग मीही तेथून उठतों व आपल्या वाटेनें पुढें होतों. कोठें मोट चाललेली असते, व तिच्या धांवेच्या "कुऊ कुऊ" अशा आवाजांत विहिरीशेजारच्या आंब्यावरची कोकिळा आपला "कुऊ कुऊ" शब्द मिसळीत असते, व मी लोभावून तेथेंच थबकतों. मध्येंच एखाद्या ठिकाणीं स्वयंस्फूर्तीनें फोंफावलेल्या रानवट फुलझाडांचा मोठा मोहक ताटवा बाजूला दिसतो, व तो दिसल्यावर रस्ता सोडून त्या ताटव्याजवळ गेल्याशिवाय मला राहवत नाहीं. एखाद्या वळणावर दोन्ही बाजूंच्या वृक्षशाखांची गमतीदार कमान झालेली असते, आणि त्या कमानींतून क्षितिजावरच्या सूर्यमंडलाचा देखावा अवर्णनीय भासतो. तो ओझरता पाहून आपल्या वाटेनें झपाझप निघून जाणारीं माणसें दुर्दैवी म्हटलीं पाहिजेत. मध्येंच कोठें तरी रस्त्यावरच्या एखाद्या पुलाच्या खालीं बाभळीचीं झाडें बहरलेलीं असतात, आणि रमणाच्या हृदयावर मस्तक ठेवून निजणाऱ्या रमणीच्या निश्वासांतला उन्मादकपणा चहूंकडे

दुरवळून टाकणारे ते बाभळीचे सुवर्णरंगी केसरगुच्छ खुडून घेण्यांत मी खुशाल पांचदहा मिनिटें घालवितों.

अशा स्वच्छंदानें, एकट्यानें, रमत गमत सहल केली तरच ती खरी सहल. अशा सहलीपासूनच खरा आनंद होतो. इतकेंच नव्हे तर, आपली ही इहलोकांतील यात्रा म्हणजे देखील एक सहलच होय, असें माणसानें मानावें म्हणजे तो सुखांत राहील. माणसानें एकमार्गी असावें, आपलें ध्येय ठरवावें, आणि आजूबाजूस दृष्टि न टाकतां सरळ त्या ध्येयाच्या वाटेनें जावें असा उपदेश पुष्कळदां करण्यांत येतो. पण मला वाटतें हा सल्ला कांहीं फारसा हिताचा नाहीं. किंबहुना बहुतेक माणसांच्या दुःखांचें कारण तीं एकमार्गी असतात हेंच असतें. त्यांना आपल्या धंद्याखेरीज कांहीं दिसत नाहीं, मुक्काम गांठायसाठीं तीं धांवत असतात, घामाच्या धारा पुशीत असतात, आणि अजून मजल किती उरली तें पुनःपुन्हा टांचा उचलून व मान उंच करून पहात असतात. अशा सर्वांना त्यांच्या हिताची एकच गुजगोष्ट सांगतों, कीं त्यांनीं जीविताच्या रस्त्यावरून धांवत पळत जाण्याऐवजीं रमत गमत स्वच्छंदानें सर्व सुंदर वस्तूंचा उपभोग घेत सहल करावी. मग सुखाचा शोध निराळा करावयास नको.

—मार्च, १९३३

प्रो. ना. सी. फडके, एम्. ए.

यांची

पुढील कादंबरी

# उद्धार !

लवकरच प्रकाशित होईल.